


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

वर्ष ३ रें ] ऑक्टोबर १९४९ [ अंक १ ला

**गांधीजयन्तीनिमित्त :** गांधीजींचें जीवनकार्य आणि त्यांचे सिद्धान्त इत्यादींवर श्री. शंकरराव देव, आचार्य जावडेकर, श्री. रंगराव दिवाकर, श्री. वालजी गोविंदजी देसाई, श्री. शं. वि. ठकार, श्री. ह. कृ. मोहनी इत्यादींचे विचारप्रवर्तक लेख; पाश्चात्य विचारवंतांचे मननीय विचार.

**क्रान्तिरसासंबंधीं :** डॉ. के. ना. वाटवे, प्रा. य. र. आगाशे, श्री. ना. ग. जोशी यांचे उद्बोधक लेख.



कविता, सारसंकलन वगैरे

**किंमत १ रुपया**








अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

वर्ष तिसरें
अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोबर
१९४९

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाकरितां तेथेंच नवभारत कार्यालयांत प्रसिद्ध केलें.







# 'नवभारत', ऑक्टोबर १९४९

## लेखक–परिचय

**श्री. शंकरराव देव**– राष्ट्रसभेचे सर-चिटणीस; 'भगवान् बुद्धासाठीं' इत्यादि पुस्तकांचे कर्ते; 'नवभारत' मासिकाचे संचालक.

**आ० शं. द. जावडेकर**– सुप्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ आणि ग्रंथकार, महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष, 'नवभारता'चे एक संपादक.

**श्री. शं. वि. ठकार**— खादीकार्य, ग्रामसेवा, भिल्लसेवा या क्षेत्रांतील निष्ठावंत कार्यकर्ते; हल्लीं ग्रामोद्योग-समितितर्फे श्रीगोंद्याजवळ घायपातवाडी येथें कार्य करीत आहेत; 'ख्रिस्तधर्मीयांस गांधीजींचें आव्हान' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. वालजी गोविंदजी देसाई**— गांधीजींचे जुने निष्ठावंत विद्वान् सहकारी; गुजरांत विद्यापीठामधील माजी प्राध्यापक; 'हरिजन'मध्यें यांचें नियमित लेखन पूर्वीपासून येत असतें. 'गोरक्षा–कल्पतरु' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**श्री. ह. कृ. मोहनी** (नागपूर)— 'आमचा सनातन धर्म' इत्यादि पुस्तकांचे लेखक; 'नवभारत' मासिकाचे एक संपादक.

**श्री. मंगेश पाडगांवकर** (मुंबई)—उदयोन्मुख प्रतिभाशाली कवि; त्यांचा 'धारानृत्य' हा कवितासंग्रह प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

**श्री. रा. ग. कुंभोजकर**, एम्. ए., बी. टी.—सांगली येथील ट्रेनिंग कॉलेजचे उप प्राचार्य; 'कल्पनाविलास', 'रस्ते आणि फिरस्ते' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**प्रा. गं. बा. सरदार**— पुणें येथील ना. दा. ठा. कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक; 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. रंगराव दिवाकर**—कर्नाटकचे सुप्रसिद्ध पुढारी; मध्यवर्ती भारतीय सरकारचे 'नभोवाणी' खात्याचे मंत्री.

**डॉ. के. ना. वाटवे**—पुणें येथील स. प. कॉलेजमधील मराठीचे प्राध्यापक; 'रसविमर्श', 'संस्कृत काव्याचे पंचप्राण' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**प्रा. य. रा. आगाशे**—अहमदनगर येथील मिशनच्या कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक; 'सारस्वत-समीक्षा' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. ना. ग. जोशी** एम्. ए.–(बडोदें)– 'जीवनयोग', 'विश्वमानव,' आगामी 'पैगंबराचा बगीचा' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**प्रा. ए. रा. धोंगडे** B. Com. (London)—मुंबईच्या सिडेनहॅम् कॉलेजमध्यें प्राध्यापक; हे व प्रा. बहल यांनीं 'Elements of Commerce' हें पुस्तक लिहिलें आहे.

**प्रा. अ. के. भागवत**–पुणें येथील बृ. म. कॉमर्स-कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

**प्रा. ना. अ. गोरे**—कुमठा येथील कॅनरा कॉलेजचे प्राचार्य व संस्कृत आणि अर्धमागधीचे प्राध्यापक; 'A. Bibliography of the Ramayana' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

अनुक्रमणिका




# महान् कर्मयोगी महात्मा गांधी

## परमेश्वराच्या उपासनेचा अभिनव मार्ग

गांधीजी हे मूळ अंतःकरणप्रवृत्तीनें धार्मिक होते, परमेश्वरावर त्यांची श्रद्धा होती. मानवी जीवनाचें साध्य किंवा परम पुरुषार्थ परमेश्वराची प्राप्ति करून घेणें हा आहे अशी त्यांची निष्ठा होती. आपल्या आत्मकथेच्या प्रस्तावनेंत ते लिहितात : "मला जें साध्य करून घ्यावयाचें आहे, ज्या एकमेव साध्याकरितां मी सारखा तळमळत आहे व धडपड करीत आहे, तें म्हणजे आत्मसाक्षात्कार, परमेश्वराचें प्रत्यक्ष दर्शन. याच परम ध्येयाच्या निदिध्यासानें माझ्या जीवनाच्या सर्व वृत्ती भरून राहिल्या आहेत. भाषण—वा—लेखनद्वारा जें जें मी करीत आहे, राजकारणाच्या क्षेत्रांतही जे जे मी प्रयत्न चालविले आहेत, त्या सर्वांचें उद्दिष्ट हेंच आहे." या दृष्टीनें पहातां, ज्यांनीं आपल्या जीवनाचा परम पुरुषार्थ परमेश्वरप्राप्ति हा मानिला व आपल्या चैतन्यदायी जीवनयात्रेनें हा इहलोक पुनीत केला, अशा साधुपुरुषांची जी दीर्घ परंपरा अविच्छिन्नपणें चालत आली आहे, त्यांतीलच गांधीजी हे एक निःसंशय होत. परंतु गांधीजींचें वैशिष्ट्य असें कीं, त्यांनीं सत्य हाच परमेश्वर आहे असा अत्यंत भव्य विचार मांडला; त्या परमेश्वरानें निर्माण केलेल्या प्राणिमात्रांवर प्रेम करून त्यांची सेवा करण्यानेंच त्या परमेश्वराचा साक्षात्कार करून घेतां येईल अशा अपूर्व व अभिनव साधनेचा मार्ग दाखविला. यामुळें जगांतील साधुसंतादि धर्मविचारकांच्या तेजोमय नभःप्रांगणांत गांधीजींच्या 'आध्यात्मिकतेचा तारा आपल्या दिपविणाऱ्या तेजानें सदैव चमकत राहील यांत शंका नाहीं.

सत्य हाच परमेश्वर आहे, अशी गांधीजींची आत्यंतिक निष्ठा होती. ते म्हणतात: "माझ्या सारख्या निरपवाद अनुभवांवरून माझी अशी खात्री पटली आहे कीं, सत्यापरता परमेश्वर नाहीं. परमेश्वराच्या असंख्य व्याख्या आहेत. कारण, त्याच्या विभूतीच असंख्य आहेत. त्या बघून माझें मन आश्चर्यानें, आदरानें, आणि भीतीनें संभ्रान्त होतें; क्षणभर मी स्तिमितही होतों! परंतु शेवटीं मी परमेश्वराची सत्य म्हणूनच उपासना करतों." गांधीजींच्या मतें, "सत्य हेंच सर्वोच्च तत्त्व असून त्यांत इतर अनेक तत्त्वांचा अंतर्भाव होतो. हें सत्य केवळ वाचिक सत्यच नसून तें मानसिक सत्यही आहे, सत्यसंकल्पही त्यांत अभिप्रेत आहे; आपल्या विचारांतील तें केवळ सापेक्ष सत्य नसून तें निरपेक्ष केवल ( Absolute ) असें सत्य आहे, तें नित्य आहे, तेंच परमेश्वर आहे."

## किसानांच्या भेटींत परमेश्वराचा साक्षात्कार!

या सत्याचा, या सत्यस्वरूपी परमेश्वराचा साक्षात्कार कोणत्या मार्गानें करून घ्यायचा? त्याचें साक्षात् दर्शन कसें घ्यायचें? त्याकरितां दीर्घ व खडतर तपश्चर्या अरण्यांत जाऊन केली पाहिजे का? छे! गांधीजींचा तरी हा मार्ग नव्हता! त्यांनीं लिहिलें आहे : "सत्याच्या विश्वव्यापी स्वरूपाचें साक्षात् दर्शन घ्यायचें तर आपणांला क्षुद्रांतल्या क्षुद्र जंतूवरही आत्मवत् प्रेम करतां आलें पाहिजे. अशी साधना करायचा ज्याला निदिध्यास लागला आहे, त्याला जीवनाच्या क्षेत्रापासून दूर जाऊन चालणार नाहीं. मी जो राजकारणाच्या क्षेत्रांत आकर्षिला गेलों त्याचें कारण माझी ही सत्यावरील निष्ठा होय."






म्हणूनच परमेश्वराचा हा परम भक्त, सत्याचा हा महान् साधक सामाजिक आणि राजकीय क्षेत्रांत या युगांतील सर्वश्रेष्ठ क्रान्तिकारक ठरला! आणि जगांतील अत्यंत बलाढ्य अशा साम्राज्यशाहीविरुद्ध दीर्घकालपर्यंत - दडपल्या गेलेल्या हिंदवासीयांनीं जें महान् क्रांतिकारक आंदोलन केलें त्या दुर्दम्य क्रांतिकारक आंदोलनाचें नेतृत्व या महान् क्रांतिकारकानें केलें! या क्रांतिचें नेतृत्व करणें हा त्यांच्या परमेश्वरप्राप्तीच्या तपःसाधनेचा एक भाग होता. त्यांच्या मानवजातीवरील प्रेमाचा तो प्रत्यक्ष परिपाक होता. आपल्या बांधवांवर प्रेम करून त्या प्रेमाच्या द्वारा गांधीजींना आपल्या 'परम पित्याशीं' सायुज्य गांठावयाचें होतें. चंपारण्यांत किसानांचा उद्धार करण्याकरितां सत्याग्रहाची चळवळ चालवीत असतांना गांधीजींना अशा परमाच्च कोटींतील अनेक उत्कट अनुभव आले. त्यांतील एकाचें वर्णन करितांना त्यांनीं लिहिलें आहे: "या किसानांच्या भेटींत मला परमेश्वराचा, सत्याचा, अहिंसेचा साक्षात्कार होत असे, असें म्हणण्यांत बिलकुल अतिशयोक्ति नाहीं. तें अक्षरशः सत्य आहे."

## संपूर्ण जीवन

परमेश्वर शोधून काढायला गिरिकंदरांत जाऊन रहाण्याची किंवा आर्त श्रीमंत भक्तजनांनीं बांधलेल्या टोलेजंग देवालयांतून पूजा-अर्चा करण्याची गांधीजींना आवश्यकता वाटली नाहीं. परमेश्वर हा साध्या बाजारहाटांतूनही आढळणें शक्य आहे, साध्या ग्रामीण जनतेच्या रूपानें तो तेथें वावरत असतो, अशी त्यांची निष्ठा व प्रत्यक्ष अनुभवही होता. मानवाच्या स्वरूपांतील असलेल्या परमेश्वराचें पूजन करणें त्यांना आवडे; कारण, मानवाचें शरीर हें परमेश्वरानें आपल्या वास्तव्याकरितां बांधलेलें एक अत्यंत सुंदर देवालय होय. म्हणूनच गांधीजी संन्यासी झाले नाहींत. त्यांच्या जीवनांत 'निवृत्ति' नव्हती; 'प्रवृत्ति', चांगली कर्मकुशल अशी प्रवृत्ति होती. त्यांचें जीवन संपूर्ण होतें. केवळ ध्यानानें आत्मसाक्षात्कार होणें शक्य नाहीं अशी त्यांची श्रद्धा होती. जीवनाशीं ऐक्य किंवा सायुज्य, एकतानता साधायची असेल तर ती केवळ आध्यात्मिक आणि मानसिक पातळीवरूनच नव्हे तर सामाजिक आणि भौतिक पातळीवरूनही साधावयास पाहिजे, असें त्यांचें मत होतें. जीवन जगायचें तर तें संपूर्ण (complete) जीवन जगावें, ह्यावर त्यांचा कटाक्ष होता. कारण अशा संपूर्ण जीवनांतच मानवतेशीं समरस होण्याची, भूतमात्रांची सेवा करण्याची संधि मिळूं शकते. म्हणूनच हा महात्मा परमेश्वरनिष्ठ (man of God) असूनही महान् कर्मयोगी होता. आपल्या प्रत्यक्ष जीवनानें गांधीजींनीं असें दाखवून दिलें आहे कीं, या दोन गोष्टी विसदृश नाहींत; त्यांचाही समन्वय होऊं शकतो.

## आपल्याबरोबर देशाचेंही जीवन शुद्ध केलें

प्रत्येक प्राणिमात्राशीं ऐक्यवृत्ति किंवा समरसता साधावयाची असेल, तर ती आत्मशुद्धीशिवाय अशक्य आहे, असें गांधीजी कटाक्षानें प्रतिपादीत असत. ते म्हणतात: "ज्याचें अंतःकरण शुद्ध नाहीं त्याला परमेश्वर कधींही प्राप्त होणार नाहीं." ज्याला अहिंसामय, सेवामय जीवन घालवावयाचें आहे, त्यानें आपल्या क्षुद्र संकुचित स्वार्थाविषयीं ममत्व उत्पन्न करणारे अशुद्ध विचार व आचार वर्ज्य केले पाहिजेत. सदाचाराचा अविरत प्रयत्न चालू ठेवणें, फलाची वासना न धरतां निष्काम दृष्टीनें परोपकार करीत राहणें या योगानेंच अंतःकरणशुद्धि होऊं शकेल. या दृष्टीनें पहातां जीवन ही एक 'साधना' च बनते. या जीविताच्या ध्येयाची गांधीजींना जेव्हांपासून जाणीव झाली, तेव्हांपासून त्यांचें जीवन म्हणजे एक महान् 'साधना' बनलें! मनुष्य हा समाजांत राहतो. जीवन हें एकात्म आहे. म्हणून माणसाच्या सत्कृत्यांचा वा दुष्कृत्यांचा आजूबाजूच्या जीवमात्रांवर बरावाईट परिणाम होणें हें अपरिहार्य आहे. गांधीजींचें जीवन तर संपूर्ण व सर्वांगीण, समाजाशीं एकरूप झालेलें असें सामाजिक जीवन होतें. म्हणून स्वतःचें जीवन शुद्ध करण्याकरितां त्यांनीं केलेले प्रयत्न म्हणजे सबंध देशाचेंच जीवन शुद्ध करण्याचे प्रयत्न होत. शिवाय शुद्धि ही गोष्ट सांसर्गिक (infectious) आहे. त्यामुळें गांधीजी हे असें कांहीं महान् विलक्षण शक्त्युत्पादक केंद्र बनले कीं, त्यांतून निघणाऱ्या प्रेरणांनीं, लक्षावधि






बंधुभगिनींचें जीवन उन्नत झालें, त्यांत नवीन चैतन्याचा संचार झाला! त्याचेंच फळ म्हणजे हिंदुस्थानचें स्वातंत्र्य होय. आतां गांधीजींच्या पश्चात् आपले प्रयत्न चालूं ठेवणें, आणि गांधीजींनीं जें राजकीय स्वातंत्र्य आपणांस प्राप्त करून दिलें तें विकसित करणें, आपल्या जीवनाला सत्यता आणि कृतार्थता लाभेल इतकें तें स्वातंत्र्य विकसित करणें हें सर्वांचें कर्तव्य आहे.

गांधीजींची जयंती येत्या दोन तारखेला येत आहे. त्यानिमित्तानें त्या महात्म्याचें आणि त्याच्या महान् तत्त्वांचें पुण्यस्मरण करून त्या महान् कर्मयोग्यानें जो मार्ग आपणांस दाखवून दिला, त्याचा मागोवा घेत आपण पुढील वाटचाल करूं या.

---

## ८१ वी चरखाजयंती

चरख्याचा खरा उद्देश छोट्या छोट्या प्रमाणांत (units) जीवनाच्या अन्नवस्त्रादि प्राथमिक गरजांच्या बाबतींत जनतेला स्वावलंबी व स्वयंपूर्ण करणें हा आहे. हा उद्देश कोणा एका बड्या संस्थेमुळें अगर समूहामुळें सिद्ध होणार नाहीं. त्यासाठीं चरख्याचा मूळ हेतु आणि त्याविषयींच्या आनुषंगिक भावना जाणणाऱ्या व त्याचप्रमाणें त्याला आपल्या आचरणानें व प्रचारानें व्यावहारिक रूप देणाऱ्या सेवकांचीं छोटीं छोटीं मंडळें हजारोंच्या संख्येनें जागोजागीं निर्माण झालीं पाहिजेत. अशा रीतीनें चरखाप्रचारक मंडळें स्थापन करण्याची चरखासंघानें कल्पना काढली व त्यांना 'कताईमंडळें' असें नांव दिलें आहे. साहजिकच अशा मंडळाचें पहिलें काम वस्त्रस्वावलंबनाचें वातावरण तयार करणें व वस्त्रस्वावलंबी कताई वाढूं शकेल अशी व्यवस्था अपापल्या क्षेत्रांत करणें—हें राहील. हें काम श्रद्धेनें, निष्ठेनें स्वतः आधीं ती गोष्ट कृतींत आणणारे सेवकच करूं शकतात. चरखासंघानें अशा सेवकांचे सहयोगी व वस्त्रस्वावलंबी असे दोन वर्ग केले आहेत. अशा तऱ्हेचे चरखासंघाचे सहयोगी व वस्त्रस्वावलंबी कमींत कमी दहा सेवक एकत्र येऊन 'कताईमंडळा'ची स्थापना करून चरखासंघाशीं तें संलग्न करूं शकतील आणि संघाच्या व्यवस्थेचा फायदा घेऊं शकतील.

कताई-मंडळाची स्थापना करण्याच्या प्रमुख कार्याबरोबरच चरखा संघाचे सहयोगी सभासद वाढविण्याचा, त्याचप्रमाणें जे सहयोगी सभासद होऊं शकत नाहींत त्यांचेकडून सुताची वर्गणी वसूल करण्याचा व खादीधारी लोकांची नोंदणी करण्याचा विचारही संघानें केला आहे.

संघाचा सहयोगी सभासद म्हणजे तोच कीं, चरख्याच्या द्वारें शोषणरहित समाजस्थापनेवर ज्याचा विश्वास आहे आणि या विश्वासामुळें जो संपूर्ण खादीधारी होऊन आपल्या शक्त्यनुसार स्वतः नियमित सूत कातून अशा सुताच्या सालीना सहा गुंड्या देऊन जो चरखासंघाचा सभासद होईल. शोषणरहित समाजनिर्मितीसाठीं श्रमप्रतिष्ठा राखण्याची आवश्यकता आहे. याचसाठीं गांधीजी नेहमीं पैशाच्या बदलीं श्रमाच्या वर्गणीवर भर देत असत. आणि अशा श्रमाच्या वर्गणीचें प्रतीक म्हणून सुताची वर्गणी ही सर्वांत अधिक सोईस्कर व लोकोपयोगी असल्यानें तिलाच ते विशेष महत्त्व देत असत. यासाठीं संघाच्या सभासदत्वाची वर्गणीही पैशांत न ठेवतां सुताच्या रूपानें घेण्याचें ठरविलें आहे. कोणत्याहि कारणानें जे संघाचा सभासद होऊं शकणार नाहींत, त्यांना जयंतीच्या निमित्तानें गांधीजींना श्रद्धांजलि अर्पण करण्यासाठीं व चरख्याच्या कार्यक्रमाचा प्रसार करण्यासाठीं आपलें श्रमदान देतां यावें या हेतूनें सूत-वर्गणीचा कार्यक्रम ठेवण्यांत आला आहे. ही वर्गणी चरखासंघाकडेच पाठविली पाहिजे अशी आवश्यकता नाहीं. या वर्गणीचा उपयोग स्थानिक कताईमंडळाच्या किंवा खादीच्या कार्यासाठीं करतां येईल. पण जनतेपुढें अशा वर्गणीचा हिशेब हजर करण्यासाठीं त्यासंबंधीं माहिती संघाच्या कार्यालयांत अगर केंद्रांत पाठविली जावी.

—अखिलभारत चरखासंघ, सेवाग्राम, वर्धा






आचार्य : शं. द. जावडेकर

# राष्ट्रिय लोकशाही आणि सत्याग्रहक्रांति

सत्याग्रह हें एक अखंड क्रांतिशास्त्र आहे असें मी मानितों. आपल्या देशांत परकीय सत्तेचें राज्य असतांना म. गांधींनीं सत्याग्रहाचे प्रयोग व लढे केले. आज आपण राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळविलें असून या देशांत लोकशाही राज्य स्थापन झालें आहे. अशा परिस्थितींत सत्याग्रहाला—विशेषतः सविनय कायदेभंग हें जें त्याचें क्रांतिकारक अंग त्याला कांहीं स्थान आहे काय ? हा प्रश्न आपल्या देशांतील राजकीय व्यवहार व आमचें यापुढील राजकीय तत्त्वज्ञान या दोनहि दृष्टींनीं अत्यंत महत्त्वाचा आहे. म. गांधींच्या जयंतीच्या वेळीं या प्रश्नाचा थोडा तात्त्विक दृष्टीनें विचार करण्याचें या लेखांत योजिलें आहे.

अनेकांना अलीकडे असें वाटूं लागलें आहे कीं, आपल्या देशांत राष्ट्रीय सरकार स्थापन झालें असतांना आणि लोकशाही राज्य चालूं असतांना त्यानें केलेल्या कोणत्याहि कायद्याविरुद्ध सविनय कायदेभंगाची भाषा बोलणें किंवा सत्याग्रही क्रांतीची आवश्यकता पुरस्कारिणें हें तत्त्वतःच चुकीचें आहे; सविनय कायदेभंग आणि अनत्याचारी असहकार हे मार्ग परकीय अनियंत्रित राज्यसत्तेविरुद्धच समर्थनीय आहेत; स्वकीय लोकनियंत्रित राज्यांत सविनय कायदेभंग किंवा अनत्याचारी असहकार यांचा पुरस्कार तत्त्वतःच असमर्थनीय आहे. या मतांतील हेत्वाभास दाखवून देण्याचा प्रयत्न या लेखांत मी करणार आहे.

## सॉक्रेटीस व थोरो यांचीं उदाहरणें

या प्रश्नाचा विचार करीत असतां प्रथमच सुचणारीं उदाहरणें म्हणजे सॉक्रेटीस व थोरो या दोघांचीं देतां येतील. सॉक्रेटीस हा अँथेन्समधील आदर्श नागरिक गणला जातो आणि त्यानें अँथीनिअन लोकशाहीनें दिलेली शिक्षा भोगून आपल्या मत-प्रचारस्वातंत्र्याचें जें रक्षण केलें, तें त्याचें कृत्य सत्याग्रही वृत्तीचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून प्रसिद्ध आहे. थोरो हाहि अमेरिकन लोकशाहीखालीं नांदणारा आदर्श नागरिक होता व त्यानेंहि आपल्या लोकशाही राज्यांतील जुलमी कायद्यांविरुद्ध सविनय कायदेभंग करून जुलमाचा निषेध करण्याचा व स्वतः तुरुंगांतील क्लेश भोगून आपल्या राज्याचें नैतिक शुद्धीकरण करण्याचा उपदेश केलेला आहे. हीं दोन जगत्प्रसिद्ध उदाहरणें लक्षांत घेतल्यास सत्याग्रहाचा व सविनय कायदेभंगाचा उपयोग लोकशाही राज्यांतील सरकाराविरुद्ध करणें नैतिक व राजनैतिक दृष्टीनें पूर्णपणें समर्थनीय आहे, असेंच दिसून येईल. किंबहुना याच्याहि पुढें जाऊन आपणास असें म्हणावें लागेल कीं लोकशाही राज्याची उभारणी मतस्वातंत्र्य व प्रचारस्वातंत्र्य यांच्यावरच झालेली असल्यानें लोकशाही राज्यांत प्रचारस्वातंत्र्यावर गदा आली असतां तिचा सत्याग्रहानें प्रतिकार करण्याची कल्पना सुचणें अधिक साहजिक आहे. जेथें लोकशाही राज्य नसतें, तेथें व्यक्तीला मतस्वातंत्र्य व प्रचारस्वातंत्र्य यांचें इतकें महत्त्वच वाटत नसतें. यामुळें अशा राज्यांतील लोकांना सत्याग्रहाची कल्पनाहि सुचणें अधिक दुर्घट आहे. सविनय कायदेभंगाची कल्पना थोरोच्या प्रतिपादनांत आढळल्यानंतर म. गांधींच्या मनावर तिचा फार मोठा परिणाम झाला हें सर्वश्रुत आहे.

## समाजवादासाठीं सत्याग्रहाचा उपयोग

लोकशाही राज्य असलें तरी त्यांत भांडवल-शाही नांदत असेल, तर ती शुद्ध किंवा





अनुक्रमणिका

खरी लोकशाही असत नाहीं; म्हणून भांडवलशाही ही लोकशाहीची खरी वैरीण आहे हें आपणांस आज अनुभवानें पटतच आहे. या बाबतींत जेम्स ब्राईस याचें ' अमेरिकन् कॉमनवेल्थ ' या ग्रंथांतील पुढील वाक्य अत्यंत संस्मरणीय आहे: "Of the power of wealth, democracies may well say with Dante: 'Here we find the great enemy ''. अर्थात् या धनसत्तेचा उच्छेद करून लोकशाहीला समाजवादी स्वरूप द्यावें असें वाटणें अगदीं साहाजिक आहे. पण भांडवलदार लोकशाहीचें समाजवादी लोकशाहींत रूपान्तर करतांना लोकशाहीच नष्ट होऊन तिच्या जागीं हुकुमशाही येणार नाहीं अशी दक्षता घ्यावी लागते. जर अत्याचारी क्रांतीचा मार्ग अनुसरला तर बराच काळ देशांत एकपक्षीय अनियंत्रित सत्ता स्थापन होते व त्यानंतर पुनः लोकशाही निर्माण करणें कठिण जातें असा अनुभव रशियांत आला आहे. याच्या उलट केवळ प्रातिनिधिक संस्थांतील युक्तिवादावरच अवलंबून राहून धनिक सत्तेचा उच्छेद करावा असें म्हटलें, तर ब्रिटनमधील समाजवादी पक्षाप्रमाणें फारच मंद गतीनें प्रगति होईल अशी आशा धरून शेंकडों वर्षें आर्थिक विषमता सहन करीत बसावें लागतें. ब्रिटनला साम्राज्यांतील लूट मिळत असल्यानें आणि औद्योगिक प्रगतींत तें राष्ट्र इतर कोणत्याहि राष्ट्राहून निदान शंभर वर्षें तरी पुढें गेलें असल्यानें आतापर्यंत या क्रमाविकासाच्या मंद किंवा भ्रामक साधनावर अवलंबून राहून त्याचा कसातरी निभाव लागला. पण हिंदुस्थानसारखीं जीं राष्ट्रें जगाच्या मागें दोनशें तरी वर्षें राहिलीं आहेत, आणि ज्या राष्ट्रांतील जनता परकीय भांडवलशाहीनें व साम्राज्यशाहीनें रक्तशोषण केल्यानें निःसत्त्व बनली आहे, त्या राष्ट्रांना ब्रिटनसारख्या जरठ धनिक राष्ट्राचा मंद प्रगतीचा सनदशीर मार्ग मुळींच उपयोगी पडणार नाहीं. म्हणून आम्हांस राष्ट्रीय लोकशाहीला मारक न होणारा, पण क्रांतिमार्गाप्रमाणें जलद प्रगति करणारा सत्याग्रही किंवा अनत्याचारी क्रांतीचा मार्ग स्वीकारून आपल्या देशांत समाजवादी क्रांति करून दाखविण्याचें धोरण स्वीकारणें अवश्य झालें आहे. म. गांधींनीं जें अनत्याचारी क्रांतीचें तत्त्व आपणांस दाखवून दिलें आहे, त्याच तत्त्वाचा अवलंब करून आपणांस हिंदुस्थानांत समाजवादी लोकशाही स्थापन करतां येईल, हें आपले पंतप्रधान पं. नेहरू यांनीं आपल्या आत्मचरित्रांत पुढील शब्दांत मांडिलें आहे :

"If we can get political freedom and elimination of British Imperialism in India non-violently, why should we not also solve the problem of the feudal princes and landlords and other social problems in the same way and establish a Socialist State ? ... ... Surely, it cannot be said that a non-violent method can only be used against a foreign ruler. *Prima facie* it should be far easier to use it within a country against indigenous selfish interests and destructionists, for the psychological effect on them will be greater than elsewhere."

—Autobiography, p. 347

वरील उताऱ्यांत पं. नेहरू यांनीं असें म्हटलें आहे कीं जर आपण अनत्याचारी मार्गानें ब्रिटिशांच्या साम्राज्यसत्तेचा लोप करूं शकलों, तर त्याच मार्गानें पुढें जाऊन जमीनदार, जहागीरदार व इतर हितसंबंधी वर्ग यांचा बंदोबस्त करणें व समाजवादी राज्य स्थापणें शक्य झालेंच पाहिजे. परकीयांपेक्षां स्वकीय विरोधकांच्या मनावर अनत्याचारी पद्धतीचा अधिक प्रभाव पडेल हें उघड आहे, असा पंडितजींचा युक्तिवाद आहे. तात्पर्य, अनत्याचारी असहकार व सत्याग्रह या साधनांचा उपयोग करून समाजवादी लोकशाहीची स्थापना करणें आपणांस अगदीं शक्य आहे व तसें करणें पूर्णपणें समर्थनीय आहे असा पं. नेहरूंच्या वरील विवेचनाचा अर्थ आहे.

## मालमत्तेचा हक्क आणि समाजवादी लोकशाही

समाजवादी लोकशाहीची स्थापना करतांना आजच्या भांडवलदार वर्गाच्या मालमत्तेच्या हक्कांना धक्का लावावा लागेल हें उघड आहे. पण असे समाजवादी कायदे जर लोकशाही पद्धतीनें बहुमतानुसार करण्यांत आले, तर ती धनिकांवर सक्ती

होते या सबबीवर असे कायदे अनैतिक आहेत, असें म्हणतां येईल काय ? या प्रश्नाचाहि विचार पं. नेहरू यांनीं आपल्या 'आत्मचरित्रां'तील याच प्रकरणांत केला आहे. यासंबंधीं ते म्हणतात :

"If a law, affecting property rights or abolishing them, is passed by a majority, is that to be objected to, because it is coercion? Manifestly not, because the same procedure is followed in the adoption of all democratic rights. Objection cannot be taken on the ground of coercion."

म्हणजे मालमत्तेच्या हक्कांना धक्का लावणारा किंवा ते नष्ट करणारा एखादा कायदा बहुमतानें केला, तर त्यामुळें सक्ती होते म्हणून त्यावर आक्षेप घेतां येईल काय ? पंडितजी म्हणतातः "मुळींच नाहीं; कारण याच पद्धतीनें सर्व कायदे होत असतात". अर्थात् ते जे पाळणार नाहींत, त्यांवर ते पाळण्याची सक्ती होणारच. कायदा मोडणाऱ्या चोराला जशी शिक्षा होते तशी कायदा मोडणाऱ्या धनिकालाहि होणारच. ही सक्ती दोघांवरहि होणार; त्यावांचून राज्यच चालणार नाहीं. असे कायदे अनीतिमान् आहेत असें तरी म्हणतां येईल काय ? यासंबंधीं पंडितजींचें विवेचन फार समर्पक आहे. ते म्हणतात :

"It might be said that the majority was acting wrongly or immorally. The question to be considered then is: whether the law as passed by a majority offended any ethical principle. Who is to decide this? If individuals and groups are allowed to interpret ethics in accordance with their own interests, there is an end of democratic procedure. Personally I feel that the institution of private property (except in a very restricted sense) gives dangerous power to individuals over society and it is, therefore, very harmful to society. I consider it immoral, far more so than drink, which harms the individual more than society."

—Autobiography, p. 543

मालमत्तेच्या हक्कांना धक्का लावणारा कायदा हा अन्यायी किंवा अनैतिक आहे असें म्हणतां येईल काय ? या शंकेवर पंडितजी सवाल करतात : या प्रश्नाचा निर्णय कोणी लावायचा ? जर नीति-अनीतीच्या प्रश्नाचा निर्णय व्यक्तीनें अथवा वर्गानें आपापल्या स्वार्थानुसारच लावायचा असेल, तर लोकशाही पद्धतीचा अंतच झाला, असें म्हटलें पाहिजे. आपलें स्वतःचें मत पंडितजींनीं असें दिलें आहे कीं, अगदीं अल्प प्रमाणांतील मालमत्ता सोडल्यास खासगी मालमत्तेच्या हक्कामुळें व्यक्तीला समाजजीवनाला हानिकारक अशी सत्ता प्राप्त होत असते व म्हणून हे हक्कच समाजाहिताची मोठी हानि करीत असतात; म्हणून खासगी मालकशाही हीच अनैतिक आहे असें पंडितजी म्हणतात. मद्यपी मनुष्य समाजापेक्षां स्वतःचेंच अधिक नुकसान करीत असतो; पण धनिकांचे मालकी हक्क त्यांच्यापेक्षां इतरांचें फार मोठें नुकसान करतात हें लक्षांत घेतल्यास मद्यपानापेक्षां धनिकांचे मालकी हक्क अधिक अनैतिक आहेत, असें पंडितजींचें स्वतःचें मत आहे.

## सत्याग्रह आणि समाजाचें हृदयपरिवर्तन

पं. नेहरू यांचें खासगी मालकीहक्कांसंबंधींचें वरील मत सर्व समाजवाद्यांना मान्य आहे. परपीडा हेंच जर नीति-अनीतीचें गमक असेल, तर आज धनिकशाहीचे मालकी हक्क हे अनीतिकारक आहेत व म्हणून ते नष्ट करणारे कायदे हे नीतिवर्धक आहेत असें समाजवाद्यांचें मत आहे. भांडवल-शाहीचा उदय होण्यापूर्वी मालकी हक्कांना असें स्वरूप प्राप्त झालें नव्हतें आणि समाजाच्या प्राथमिक अवस्थेनंतर बराच काळ खासगी मालमत्तेच्या हक्कांमुळें समाजाच्या प्रगतीस व उन्नतीस मदत झालेली आहे याबद्दल शंका नाहीं. समाजवाद्यांना हें सर्व मान्य आहे; पण आज ते मालकी हक्क समाजाचा प्राण घेत आहेत व ती पद्धति नष्ट केल्यांवाचून समाजांतील वर्गकलह थांबूं शकत नाहीं अशी त्यांची निष्ठा आहे. ज्या मालकी हक्कामुळें येवढें भयंकर





अनुक्रमणिका

अरिष्ट समाजावर ओढवतें, ते अनीतिकारकच नव्हेत काय ? मद्यपानापेक्षां भयंकर हानि या मालकी हक्कामुळें होत असते व ते चालू ठेविल्यानें सर्व समाजच नामशेष होण्याचा धोका उत्पन्न होतो असें ज्यांना वाटतें, त्यांनीं हे अन्याय्य व जुलमी हक्क नष्ट करणारे कायदे नीतिसंवर्धक व समाजसंरक्षक मानावेत यांत नवल नाहीं. आपलें हें मत समाजाला पटवून देण्यास लोकशाही समाजवादाचे पुरस्कर्ते तयार आहेत. जोंपर्यंत आपलें हें मत बहुसंख्य मतदारांना पटलेलें नाहीं, तोंपर्यंत समाजावर तें सक्तीनें लादण्यांत येऊं नये ही लोकशाहीची नीति त्यांना मान्य आहे. पण ज्या वर्गांच्या स्वार्थावर समाजहितासाठीं नियंत्रण घालावें लागणार आहे, त्या वर्गांचें हृदयपरिवर्तन झालें तरच असे समाजवादी कायदे करावेत आणि तोंपर्यंत समाजांत पेटणारा वर्गकलह तसाच चालू देऊन समाजहिताची होळी होऊं द्यावी हें मत समाजवाद्यांना समंजसपणाचें वाटत नाहीं. सर्वच संग्रह हें पाप आहे अथवा चोरी आहे असें म्हणणाऱ्या गांधीवाद्यांना तरी मालकी हक्कानें प्राप्त होणाऱ्या अकष्टार्जित उत्पन्नाचें—म्हणजे व्याज, खंड व नफा यांचें—नैतिक समर्थन कसें करतां येईल ? अर्थात् त्यांना सुद्धां लोकशाही राजनीतीची सामान्य मर्यादा ओलांडून समाजवादी कायदे करतांना स्वार्थी धनिकवर्गांची संमति मिळविण्याची शर्त समाजवाद्यांवर लादतां येणार नाहीं. समाजवाद्यांनीं आपलीं तत्त्वें कष्टजीवी सामान्य जनतेला पटवून दिलीं म्हणजे पुरें आहे असें समजूनच गांधीवाद्यांनीं आपला राजकीय व्यवहार केला पाहिजे. समाज हाच सर्व संपत्तीचा खरा मालक आहे आणि खासगी मालमत्तावाले हे समाजाचे निधिधारक आहेत : या तत्त्वाच्या दृष्टीनें विचार केला, तरी या निधिधारकांच्या हक्कांचा संकोच किंवा विकास-विनाश करण्याचा पूर्ण हक्क समाजाला आहे हें मान्यच करावें लागतें.

अशा प्रकारें समाजाचें परिवर्तन समाजमनाचें परिवर्तन घडल्यानंतरच व्हावें हें लोकशाहीचें तत्त्व समाजवाद्यांनीं मान्य केल्यानंतर गांधीवाद्यांना आपलें अहिंसातत्त्व व्यवहारदृष्टीनें याच्यापुढें नेतां येणार नाहीं. हें तत्त्व यापुढें रेटण्याचा आग्रह धरल्यास कष्टजीवी जनता आणि अकष्टजीवी धनिकवर्ग यांच्यांतील वर्गकलहांत अन्यायी पक्षाला पाठिंबा दिल्याचें पाप त्यांच्याच 'अस्तेय' व 'असंग्रह' या तत्त्वानुसार ठरेल. अर्थात् कोणताहि खरा गांधीवादी अशी भूमिका घेऊं शकत नाहीं. तात्पर्य, 'समाजाच्या मनाचें परिवर्तन करीपर्यंत सत्याग्रह व अनत्याचारी असहकार या मार्गांचें अवलंबन करूं आणि त्यानंतर कायदेशीर सक्ती करून आम्ही लोकशाही समाजवादाची स्थापना करूं व त्याला बेकायदा अडथळा करणारांना राजदंडानें व न्याय्य मार्गानें शासन करूं', असें म्हणणाऱ्या समाजवाद्यांना गांधीवादी व्यवहारदृष्टीनें विरोध करूं शकत नाहींत. अर्थात्, खासगी मालकी हक्क व त्यांचें रक्षण हेंच सर्व नीतीचें सारसर्वस्व आहे असें धनिकवर्गाचें मत वा निष्ठा असेल, तर त्यांनींहि वाटल्यास पूर्ण अनत्याचारी वृत्तीनें आपल्या या तथाकथित नैतिक तत्त्वाचें रक्षण करावें अशी मान्यता समाजवादी देतीलच. पण परमेश्वरी साम्राज्यांत ज्यांना केव्हांही प्रवेश मिळणें शक्य नाहीं असें ज्या धनिकांचें वर्णन ख्रिस्तानें केलें अथवा अर्थ हाच सर्व अनर्थांचें मूळ आहे असा उपदेश ज्यांना वेदांती करीत असतात, त्या धनिकांच्या अंगीं मालमत्तेच्या हक्कासाठीं सत्याग्रह करण्याचें आत्मबल निर्माण होईल हें केव्हांहि शक्य नाहीं. वित्ताचा मोह आणि सत्याग्रही साधना यांतील विरोध धनिकवर्गाला कोणी समजावून देण्याची गरजच नाहीं.

## युरोपीय लोकशाहीची करुण कहाणी

युरोपखंडांत १७ व्या शतकांत ब्रिटनमध्यें आणि अठराव्या शतकांत फ्रान्समध्यें लोकशाही क्रांत्या झाल्या. पण या दोनहि क्रान्त्यांतून अखेरीस लोकशाही स्थापन न होतां धनिकशाही व साम्राज्यशाही यांचाच उदय झाला. या धनिकशाहीमुळें व साम्राज्यशाहीमुळें आज युरोपीय संस्कृति रसातळास जात आहे. खासगी मालमत्तेच्या हक्कास लोकशाहीचा मूळ आधार बनविल्याचाच हा भीषण परिणाम आहे, हें समाजवादी तत्त्वज्ञान आपणांस समजून घेतलें पाहिजे. "अर्थमनर्थं भावय नित्यम् । ... पुत्रादपि धनभाजां भीतिः..." या वेदान्ती तत्त्वज्ञानापासूनहि





अनुक्रमणिका

आपणांस हा बोध घेतां येईल. फ्रेंच राज्यक्रांतिकारकांनीं नागरिकांच्या मूलभूत हक्कांत खासगी मालमत्तेचा हक्क प्रविष्ट केला, ही घोडचूक केली असें आतां बहुतेक विचारवंतांचें मत झालें आहे. त्यासंबंधीं पं. जवाहरलाल नेहरू आपल्या Glimpses of World History या ग्रंथांत लिहितात :

"This Declaration, indeed, protected private property. The estates of the big nobles and the church were confiscated for other reasons relating to feudal rights and special privileges. But the right to own property itself was considered a sacred and an inviolable one. As you perhaps know, advanced political thought now considers that private porperty is an evil and should, as far as possible, be abolished."

फ्रेंच व तत्पूर्वी ब्रिटिश क्रांतिकारक यांनीं खासगी मालमत्तेला लोकशाहींतील मूलभूत हक्कांत स्थान दिलें आणि तो पवित्र बनविला ही चूक झाली असून खासगी मालमत्ता ही अनर्थकारक आहे व शक्य तों नष्ट केली पाहिजे, असें आपलें मत पंडितजींनीं येथें नमूद केलें आहे. आधुनिक युरोपांत निर्माण झालेली लोकशाही संस्कृति आज जमीनदोस्त होण्याचीं जीं प्रमुख कारणें आहेत, त्यांपैकीं मालमत्तेच्या हक्काला दिलेलें अनुल्लंघनीय स्थान हें प्रमुख कारण मानावें लागेल. या संबंधींचा निर्णय बहुमताच्या कसोटीनें लावून घेण्यास आही तयार नाहीं असा दुराग्रह धनिक वर्ग धरीत असतो. या दुराग्रहांतूनच भांडवलशाही युगांतील वर्गकलह पेटत असतो. आम्ही हा वर्गकलह शांततेनें मिटविण्यासाठीं लोकशाही समाजवादाची त्वरित स्थापना करणार कीं नाहीं आणि त्या कामीं सत्याग्रही क्रांतितंत्राचा उपयोग करणार कीं नाहीं, यावर आमच्या देशाचें व त्यांत स्थापन होत असलेल्या लोकशाहीचें भवितव्य अवलंबून आहे. म. गांधींनीं जें सत्याग्रही क्रांतितंत्र आपणांस शिकविलें आहे त्याचा उपयोग केल्यास लोकशाही समाजवादाची स्थापना करण्यांत यशस्वी होऊन आमची संस्कृति रशिया व अमेरिका या दोनहि राष्ट्रांहून श्रेष्ठ प्रतीची आहे, हें जगाला आपण पटवून देऊं शकूं. नाहीं तर, आमचा स्वतःच्या संस्कृतीचा अभिमान हा मिथ्या अहंकार असून आमची संस्कृति ही गुलाम-संस्कृति आहे, असें जग म्हणूं लागेल व लवकरच आम्हांस तसा प्रत्यय येऊं लागेल.

---

## अहिंसात्मक जीवनपद्धतीचें खादी हें प्रतीक आहे

निसर्ग शक्तीनें चालविलीं जाणारीं यंत्रें आज माणसावर वर्चस्व गाजवतात. त्या जागीं माणसाचें वर्चस्व स्थापन करण्याचा खादी हाच उपाय आहे. आज स्त्री-पुरुषांमध्यें जी भीषण विषमता अनुभवास येत आहे, तिच्या ऐवजीं आम्हीं खादीच्या द्वारें समता अस्तित्वांत आणण्याचा यत्न करीत आहोंत. आज श्रमाची पायमल्ली उर्मटपणानें भांडवल करीत आहे ! या प्रकाराला मूठमाती मिळून श्रमाच्या लगामीं भांडवल यावें असा मी प्रयत्न करीत आहे. गेलीं तीस वर्षें हिंदुस्थानांत जो उद्योग झाला तो जर पोकळ नसेल, तर चरख्यावर सूत कातण्याची सर्वांगपूर्ण क्रिया यापुढें अधिक उत्साहानें व अधिक बुद्धिमत्तेनें चालविली पाहिजे.

—म. गांधी, 'हरिजन' २१–१२–४७





अनुक्रमणिका

श्री. शंकर विनायक ठकार

# गांधींचें ऋण कसें फिटणार?

" दोस्त ! — टाळी ! ! " म्हणत कोणीतरी पाठीमागून माझ्या पाठीवर थाप मारली ! ! !

सुमारें २५ वर्षांपूर्वीचा हा प्रसंग. तत्पूर्वी मी शाळा-कॉलेजचें शिक्षण संपवून पुणें सोडल्याला किती तरी वर्षें होऊन गेलीं होतीं. अर्थात् वरील प्रसंग घडला तेव्हां माझें बालपण तर नव्हतेंच, पण माझें तारुण्यहि संपवून मी प्रौढावस्थेंत प्रवेश केला होता. अशा वेळीं वर्षांतून चारदोन दिवस पुण्यास येणाऱ्या व सभ्य गृहस्थाप्रमाणें भर बुधवारांतून जाणाऱ्या मजसारख्याच्या पाठीवर पोरकटपणानें कोणी थाप मारील व तत्क्षणीं टाळीसाठीं मजपुढें हात करील हें माझ्या ध्यानींमनींहि असणें शक्य नव्हतें. त्यामुळें मी साहजिकच चपापलों. पण टाळी देण्यासाठीं हात पुढें करणाऱ्याच्या चेहऱ्याकडे पाहतांच विद्यार्थिदशेंतील तो माझा मित्र असल्याचें तत्काळ माझ्या ध्यानीं आलें; अर्थातच त्यानें केलेल्या सलगीबद्दलचा रागरोष मनांतून नाहींसा झाला व मी हंसत टाळी घेण्यासाठीं हात पुढें केला.

" कशाकरितां बुवा ही टाळी ! काय प्रकरण आहे ? " टाळीसाठीं हात पुढें करतां करतांच मी उद्गारलों !

" तूं भाकीत केलेला दिवस खरोखरीच उजाडला बुवा ! " तो म्हणाला.

माझ्या कांहींच लक्षांत न आल्यामुळें मी विचारलें, " मी कसलें भाकीत केलें होतें रे ! "

" लंगोटी लावणारा मनुष्यहि जगद्वंद्य होणें शक्य आहे असें तूं म्हणाला होतास; आठवतें का ? " हंसतमुखानें डोळे मिचकावीत व हात दाबीत तो म्हणाला.

जगांत पोषाखावरूनच माणसाची किंमत होते, अशासारख्या विषयावर कॉलेजमध्यें असतांना निबंध लिहिण्यास दिलेला होता असें कांहींसें मला आठवूं लागलें. या विषयाला विरोधात्मक व त्या काळीं विचित्र व विक्षिप्त वाटणारे विचार मी प्रकट केले होते; व पोषाखावरून माणसाची पारख करणें योग्य नव्हे, असें मी प्रतिपादिलें होतें. या विषयाबाबत त्यावेळीं आम्हां कित्येक मित्रांमित्रांत जी चर्चा झाली होती त्या प्रसंगीं मित्रांनीं मला दिलेलें आव्हान त्या काळीं माझ्या सर्व परिचितांना आश्चर्य वाटण्याजोगें यशस्वीपणें मी स्वीकारलें होतें;पण त्या तपशिलांत जाण्याचें हें स्थळ नव्हे. सदरहू चर्चेच्या प्रसंगीं माझ्या तोंडून निघालेल्या उद्गारांची या मित्रानें मला सुमारें २० वर्षांनंतर आठवण दिली, ही एक प्रकारें आश्चर्य व कौतुक करण्यासारखीच गोष्ट नव्हे काय ?

मी भाकीत केलें त्या वेळेला गांधींची मला वास्तविक कांहींहि माहिती नव्हती. त्याच प्रसंगाच्या आगेमागें केव्हां तरी गांधीजी पुण्यास आले होते; व त्यांना पोंचवण्यास स्टेशनवर हजर राहिलेल्या विद्यार्थ्यांत मी एक होतों. पण त्या वेळचा त्यांचा पोषाख त्यांच्या अलीकडच्या पोषाखासारखा नव्हता. त्यांच्या तत्त्वज्ञानाची तर मला वस्तुतः कांहींच कल्पना नव्हती. असें असतां मी जें भाकीत वर्तविलें किंवा तर्क प्रकट केला तो कशाच्या आधारें बरें ? असा प्रश्न मी जेव्हां माझ्या मनास करतों तेव्हां, साध्या राहणीचें जणूं ब्रीदच पत्करलेल्या माझ्या परमपूज्य मातापित्यांचें मला स्मरण होतें.

पोषाखांत केवढी प्रचंड क्रान्ति गांधीजींनीं घडवून आणली आहे !







एका स्वच्छ गांधीटोपीमुळें सुद्धां गांधींचें नांव चिरंजीव होईल.

'टोपी धुणें' हा शब्दप्रयोगहि गांधी-टोपीच्या जन्मापूर्वी अपरिचित होता. तीच ती टोपी, घामट, तेलकट, कळकट, मळकट, दिवसानुदिवस किंवा महिनान् महिनेच काय पण वर्षानुवर्ष डोक्यावर आम्ही कशी घालीत असूं याचें आतां आश्चर्य वाटतें!

पण जशी कपड्याच्या बाबतींत तशीच मानवी जीवनाशीं जिव्हाळ्याचा संबंध असणाऱ्या अनेक बाबतींत गांधीजींनीं क्रांति घडवून आणली आहे ही गोष्ट ज्याच्या लक्षांत येते त्याला गांधीजींच्या मोठेपणाचें खरें रहस्य कळलें असें म्हणतां येईल.

* * *

"'जगांतल्या सर्वश्रेष्ठ माणसाचा इतक्यांत खून झाला!' अशी रेडिओवरील बातमी माझ्या मुलीनें धांवत येऊन आम्हांस सांगतांच गांधींचेंच नांव आमच्या मनांत कां बरें उभें राहिलें?" अशा अर्थपूर्ण प्रश्नानें लंडनच्या एका साप्ताहिकांत श्री. वुइन्स्टेन नांवाच्या एका लेखकानें आपल्या लेखास सुरुवात केल्याचें "हरिजन"च्या ता. २४ जुलैच्या अंकांत मला आढळलें.

सदरहू सुंदर लेखाचा मथळा 'राष्ट्रपिता' ('The father of a people') अशा आशयाचा आहे.

जन्मदात्या मातापित्यांचे उपकार फिटणें जसें अशक्य, तसेंच अखिल राष्ट्राच्या, किंबहुना अखिल जगाच्या कल्याणार्थ ज्यानें आपलें आयुष्य वेंचिलें त्या राष्ट्रपित्याचे उपकार फिटणेंहि अशक्यच होय. प्रत्येक मानवानें देवऋण, पितृऋण व ऋषिऋण अशीं तीन ऋणें फेडून आनृण्यपद प्राप्त करण्याची आकांक्षा बाळगावी असा आपल्या धर्माचा आदेश आहे. ऋषि म्हणजे दूरदर्शी पुरुष, गुरुस्थानीं असलेला पुरुष. अर्थात् ऋषिऋण म्हणजे गांधींचें ऋण फेडण्यासाठीं शिकस्त करणें हें आपलें कर्तव्यच नव्हे काय?

* * *

गांधीजींचे विचार सकृद्दर्शनीं कितीहि लोकविलक्षण दिसले तरी वस्तुतः तसे ते नसतात, ही गोष्ट त्यांचे विचार आपण शुद्धबुद्धीनें---म्हणजे पूर्वग्रहांनीं दूषित न झालेल्या दृष्टीनें---जर तपासले तर आपल्या लक्षांत येईल. गांधीजींचा एकहि विचार वास्तविक व्यवहाराला सोडून आहे किंवा त्याला मारक आहे असें म्हणतां येणार नाहीं. त्यांचे विचार संन्याशांसाठीं नसून मजसारख्या संसारी माणसासाठींच आहेत. आचरणांत न आणतां येण्याजोगीं तत्त्वें त्यांनीं बुद्धाचार्यांप्रमाणें कधींच प्रतिपादिलीं नाहींत. ऐहिक गोष्टींकडे दुर्लक्ष करून परमार्थाची प्रौढी गाणारे ते नव्हते. ज्ञानेश्वरमहाराजांनीं सांगितल्याप्रमाणें, "जया ऐहिक घड नाहीं। तयाचें परत्र पुससी काई॥" अशीच त्यांची दृष्टि, वृत्ति व शिकवण होती. भगवद्गीतेंत उपदेशिलेली यज्ञाबाबतची विशाल व व्यापक कल्पना त्यांना पूर्णपणें मान्य असून अशा स्वरूपाची यज्ञानुकूल प्रवृत्ति ज्याची नसेल त्याला इहलोकीं सुद्धां सुख लागणार नाहीं; मग परलोकीं सद्गति मिळण्याची गोष्ट कशाला? ("नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य, कुतोऽन्यः कुरुसत्तम।" भगवद्गीता ४-३१. "न यज्ञाविण हा लोक, कोठूनि परलोक तो।"--गीताई): अशीच त्यांची विचारसरणी होती. हीं तत्त्वें नुसतीं पठण करण्यासाठीं किंवा पूजा करण्यासाठीं नसून आचरणांत आणण्याजोगीं आहेत असा त्यांचा केवळ समज होता असें नव्हे, तर प्रसंगीं आपला स्वतःचा जीव धोक्यांत घालूनहि तीं त्यांनीं आचरून दाखविलेलीं आहेत. म्हणूनच स्वतःच्या चारित्रास त्यांनीं 'सत्याचे प्रयोग' असें अन्वर्थक नांव दिलेलें आहे. अर्थात् "लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण।" अशी टीका त्यांचे बाबतींत त्यांच्याशीं मतभेद असलेले लोकहि करूं शकणार नाहींत. उलट "आधीं केलें आणि मग सांगितलें॥" अशा 'समर्थ'-पदवीस शोभणारी त्यांची शिकवण आहे. इतकें असतांना त्यांची शिकवण कांहीं लोकांना तरी अप्रिय कां असावी हें वास्तविक कळेनासें होतें. त्यांतल्या त्यांत दुःखाची गोष्ट अशी कीं जे स्वतःस धर्मज्ञ व व्यवहारज्ञ तसेंच उच्च संस्कृतीचे व क्रान्तीचे पुरस्कर्ते म्हणवितात अशाहि कित्येकांना त्यांची शिकवण अप्रिय, असह्य, ---अगदीं त्याचा खून






# गांधींचें ऋण कसें फिटणार ?

करण्याइतकी असह्य वाटावी याचें सखेदाश्चर्य वाटतें !

* * *

"सर्वोदय क्रम" या मथळ्याखालील अग्रलेखांत ('हरिजन', ता. १० जुलै १९४९) पूज्य श्री. किशोरलालजी मश्रूवाला म्हणतात: "गांधीजींचा खुनी असें अगदीं प्रामाणिकपणें मानतोसें वाटतें कीं मानवयोनींत जन्मास आलेल्या अत्युच मानवांपैकीं एकाचा खून करण्याचें धैर्य त्याला भगवद्गीतेनें दिलें!" अर्थात् पाश्चात्य संस्कृति हीन दर्जाची व पौर्वात्य संस्कृति उच्च दर्जाची असा टेंभा मिरविणें योग्य नव्हे. मुद्दा प्रतिपादितांना त्या संदर्भांत वरील विधान करण्यांत आलें असलें तरीहि गांधीजींचा खून करणाऱ्याची हीच वृत्ति व विचारसरणी असावी, असें केवळ तर्कानें श्री. किशोरलालजी म्हणत असतील असें वाटत नाहीं. स्वतःचें नांव हिंदुस्थानच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिलें जाईल असें कोर्टापुढें स्पष्टपणें म्हणणाऱ्याची अशी मनोरचना असणें अगदीं शक्य आहे. शिवाय मध्यंतरीं या खुनी इसमानें श्री. किशोरलालजी व पू. विनोबाजी यांना आपलें सतांतर घडवून आणण्याबद्दल आव्हान दिलें होतें किंवा आवाहन केलें होतें अशा आशयाच्याही बातम्या वृत्तपत्रांत वाचण्यांत आल्या होत्या. अत एव त्यांचे विचार श्री. किशोरलालजींना समजले असण्याचाहि संभव आहे. तें कसेंहि असो; मुद्दा असा आहे कीं गांधीजींचा खून करणाऱ्याला आपला जन्म म्हणजे खुद्द भगवान् श्रीकृष्णाचा अवतार दुष्टांचा संहार करण्यासाठीं 'विनाशाय च दुष्कृताम्।' (गीता, ४·८) आहे असें वाटलें असेल ! पण प्रतिकार न करणारे, प्रार्थनेसाठीं जात असलेले वृद्ध गांधी हेच संहार करण्याइतके दुष्ट वाटावेत काय ? इतक्या मर्यादेपर्यंत गांधीजींच्या शिकवणीबद्दल कित्येकांच्या अंतःकरणांत, वाणींत व कृतींत तिरस्कार भरला होता ही शोचनीय पण सत्य गोष्ट आहे ! गांधीजींची हत्या करण्याइतके दुष्ट गांधीजी होते असें कित्येकांना कां वाटावें समजत नाहीं. म्हणूनच त्यांच्या शिकवणीबाबत जे विशेष आक्षेप घेतले जात त्यांचा थोडक्यांत परामर्श घेणें बोधप्रद होईल.

* * *

"तुम्ही लोक सत्याचें फार स्तोम माजवितां, हें बरोबर नाहीं. राजकारणांत आम्ही सत्य-बित्य कांहीं मानीत नाहीं!" असें एक गृहस्थ चर्चा करतां करतां तावातावानें उद्गारले.

राजकारणांत सत्याला स्थान नाहीं असा मुत्सद्देगिरीचा (?) सिद्धांत प्रतिपादन करणारे विद्वान् महाराष्ट्रांत थोडे नाहींत. अशा विद्वान मुत्सद्द्यांनीं गांधींची विटंबना करून त्यांना राजकारणांतून पिटाळून लावण्याकरितां त्यांच्याविरुद्ध जो किळसवाणा अपप्रचार चालविला होता त्याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. पण एका विशिष्ट प्रसंगीं या असत्यप्रचाराचा घाव माझ्या जिव्हारीं कसा लागला व गांधीजींची विटंबना करण्यासाठीं जबाबदार मानले गेलेले लोकहि अशा अपप्रचाराचा कळस करण्यास कसे उद्युक्त होत, तें प्रत्यक्ष मुलाखतींत माझ्या एकदां चांगलेंच प्रत्ययास आलें. कै. 'भाला'-कार भोपटकर यांनीं एकदां 'भाला' पत्राच्या ता. ५·१० १९२५ च्या अंकांत "साठी बुद्धी नाठी!" या मथळ्याखालील ७ नंबरच्या स्फुटांत पुढील उद्गार गांधीजींनीं काढले असें नमूद केलें होतें. "पुरुषाप्रमाणें बायकांनींहि केशवपन—मग त्या सुवासिनी असल्या तरी—करावें, असा उपदेश ते करूं लागले."

खांडवा येथील 'सुबोधसिंधु' नामक हिंदी वृत्तपत्राच्या ता. ७-१०-१९२५ च्या अंकांत याचाच उतारा आहे असें मला या प्रकरणींच्या तपासांत आढळून आलें. असो. 'भाल्यां'तील हें स्फुट वाचतांच गांधीजी किती हीन दर्जाचे आहेत हें मला साधार पटवून देण्यासाठीं एक गृहस्थ उपरिनिर्दिष्ट विधान असलेला 'भाला' पत्राचा अंक घेऊन मजकडे आले. तें वाचतांच मी म्हणालों:-- 'असें विधान गांधीजींनीं करणें शक्य नाहीं.' अर्थात् 'गांधाळ' ही शिवी मला खावी लागली! पण मी एवढ्यानें दबण्यासारखा नव्हतों. बरीच चर्चा होऊन मी त्यांच्याशीं लेखी करार केला कीं, त्यांनीं हें विधान गांधींचेंच असल्याचें सिद्ध करावें,







तसें सिद्ध झाल्यास मी गांधींचा जाहीर निषेध करण्याची कबुली दिली. शेवट असा झाला कीं कराराची मुदत संपत आली तरी ते कांहींच करीनात! हें पाहून मी 'भाला'कार भास्कर बळवंत भोपटकर यांची पुण्यास ता. २९-११-१९२५ रोजीं खास मुलाखत घेतली. त्या मजेदार मुलाखतीचा थोडक्यांत सारांश असा कीं " आम्हांला पार्टी या नात्यानें गांधींच्या विरुद्ध लिहावयाचें असतें. " असा रोखठोक जबाब भालाकारांच्याकडून मला मिळाला.

असे मला अनेक अनुभव आले असल्यामुळें, " तुम्ही लोक सत्याचें फार स्तोम माजवितां...... राजकारणांत आम्ही सत्य—बित्य कांहीं मानीत नाहीं " असें वर नमूद केल्याप्रमाणें तावातावानें म्हणणाऱ्या गृहस्थास मी म्हणालों, " राजकारणांत सत्याची लुडबूड नको, व्यापारांत खरें बोलून चालणारच नाहीं, नोकरीपेशांत सत्यबित्य गुंडाळूनच ठेवावें लागतें. व्यवहारांत सत्याला बगल दिल्याशिवाय भागणारच नाहीं; भांड्याचें तूप काढावयाचें झालें तरीहि बोट वांकडेंच करावें लागतें—इत्यादि इत्यादि विचार तुम्ही लोक प्रकट करूं लागलांत म्हणजे तुम्हांस असें विचारावेंसें वाटतें कीं, अशा सर्व क्षेत्रांत वावरतांना जर सत्याचरणाचा अवलंब करावयाचा नाहीं, तर मग तुमच्या जीवनांत सत्याला स्थान तरी कोणतें शिल्लक उरलें ?"

" तें कांहीं असो, पण व्यवहारांत असे प्रसंग येतात कीं सत्कार्यासाठींच खोटें बोलणें युक्त ठरतें ! " —आक्षेपक म्हणाले.

" तें कसें काय बुवा ? "

" अहो, असें समजा: एक कसाई गाईच्या मागें लागला आहे व रस्त्यांत तुम्ही भेटलांत म्हणून त्यानें तुम्हांस गाय कोणीकडे गेली असें विचारलें तर तुम्हांस माहीत असतांहि गाईचा प्राण वांचविण्यासाठीं त्या कसायाला चकविणें हेंच हितकर नव्हे काय ? अशा प्रसंगीं तुमच्यासारखे लोक 'सत्य, सत्य' म्हणून गाईच्या हत्येला कारणीभूत होणार, दुसरें काय ? "

" या शिवाय दुसरा मार्ग आहे हें तुमच्या कसें लक्षांत येत नाहीं ? ' सांगणार नाहीं तुला ' असेंहि तुम्ही कसायाला सांगूं शकाल, व तरीहि गाय गेली त्याच मार्गानें तो अकस्मात् चालूं लागलाच तर गोमातेच्या बचावार्थ तुम्ही असेंहि त्याला आव्हानपूर्वक सांगूं शकाल कीं ' जाऊं देणार नाहीं तुला या मार्गानें; आधीं माझे तुकडे पाड, मग गाईचे ! ' हा मार्ग कां बरें तुम्हांस सुचूं नये ? "

"वा ! हा मार्ग ठीक आहे; पण हा सुचला नाहीं बुवा ! " आक्षेपक खजील होऊन पण प्रामाणिक असल्यामुळें मनमोकळेपणानें उद्गारले. असे दिलदार आक्षेपक क्वचितच भेटतात.

" तुम्ही स्वतःस बुद्धिमान् म्हणवितां, मग हा मार्ग तुम्हांस कां बरें सुचला नाहीं, याचा कांहीं तर्क तरी चालतो का ? "

" छे बुवा, अन्य कांहीं मार्ग असेल असें मनांत आलें नाहीं. "

" याचें कारण एकच कीं तुम्ही लोक ' गांधींनीं सत्याचें व्यर्थ स्तोम माजविलें आहे ' अशी पक्की खूणगांठ मनाशीं बांधून ठेवली आहे. व आम्ही आमची बुद्धि गांधींच्याकडे गहाण टाकली आहे असा आम्हांस टोमणा मारून आम्हांस हिणविण्यांत कृतकृत्यता मानतां; पण आमचें म्हणणें इतकेंच कीं, आमच्याकडे गहाण टाकण्यास बुद्धीचें भांडवल आहे तरी ! तुमच्याकडे तेंहि नाहीं ! "

* * *

" अहिंसा, अहिंसा, हा मंत्र घोकून गांधींनीं या राष्ट्राला अगदीं शेळपट बनावलें आहे. आपल्याला हें बिलकुल पसंत नाहीं " —एक हिंदुवीर गेल्या युद्धकाळांत मला म्हणाले.

" गांधींनीं आम्हांला कधींच शेळपट बनविलें नाहीं. आम्ही इंग्रजसरकारशीं सारखा नेटानें झगडा चालविला आहे म्हणूनच ' गांधींचे लोक मर्द आहेत ' असेंच रस्त्यांतलें एखादें पोरहि सांगेल ! " असें मी समर्थन केलें, " पण तुम्ही कोठें काय काय पराक्रम गाजवले, तें तर सांगा. "

" आम्ही तूर्त संघटना चालविली आहे. वेळ आली म्हणजे आमचा पराक्रम दिसेलच. युद्धाचा काळ म्हणजे आमच्या सद्दीचा काळ : आम्ही शस्त्रास्त्रांचें शिक्षण घेणार व प्रसंग आला कीं जपान-








अनुक्रमणिका

## गांधींचें ऋण कसें फिटणार ?

जर्मनीविरुद्ध रोखलेल्या बंदुकांचीं तोंडें फिरवून तीं इंग्रज अंमलदारांकडे रोखणार !"

"वा !! काय नामी कल्पना आहे तुमची ! पण काय हो, तुमचा डाव लक्षांत न येण्याइतका हा इंग्रज मठ्ठ डोक्याचा आहे असें तुम्हांस वाटतें काय ? धन्य आहे तुमच्या मुत्सद्देगिरीची ! बरें, पुन्हा असें सांगा कीं, सैन्यांत जे सर्व सामील होणार त्यांनींच एकमेकांवर आपापल्या बंदुका रोखल्या तर ?"

"छट् ! असें कसें होईल ?"

"कां बरें ? काय अशक्य आहे ? ब्राह्मण-ब्राह्मणेतर, स्पृश्य अस्पृश्य, हिंदु-मुसलमान, महाराष्ट्रीय व तादितर यांचें आपापसांत किती वितुष्ट आहे हें वेळीं प्रसंगीं दिसत नाहीं का ? तेव्हां तुमचा विचार अमलांत आणावयाचा म्हटलें तरी देशांत ऐक्य नको काय ?"

"पुष्कळ विचार करून पाहिला, पण या मुसलमानांच्यापुढें तुमच्या अहिंसक प्रतिकाराची डाळ शिजेल असें वाटत नाहीं." एक शंकाशील आक्षेपक म्हणाला.

"माझ्या आयुष्यांतला एक छोटासा प्रसंग सांगूं का ? गांधींच्याबाबत आम्हां लोकांत अंधभक्ति व अंधश्रद्धा आहे असें तुम्ही कितीहि मोठा आक्रोश करून सांगितलें तरी तें खरें नव्हे. आम्ही आमच्या परीनें गांधींचे विचार तपासून घेतों, प्रसंगीं त्यांच्याशीं वादहि घालतों; पण त्यांचे विचार पटल्यानंतर ते ग्रहण करण्यास आम्हांला लाज वाटत नाहीं. काल‍पर्यंत मी अमके अमके विचार प्रकट करीत गेलों मग आतां ते कसे बदलूं, हीं चिंता आम्हांला वाटत नाहीं. म्हणून आम्ही गांधीजींचे विचार व्यवहारांत कितपत यशस्वी ठरतात त्याचे आपल्यापरीनें प्रसंगानुसार प्रत्यक्ष प्रयोग करीत असतों. हे प्रयोग सहसा अयशस्वी होत नाहींत असाच अनुभव येतो."

"तुम्ही कोणता प्रसंग म्हणालांत तो तर सांगा !"

"एकदां एका गांवीं मोहरमच्या सणांत वाघाचें सोंग घेतलेल्या एका इसमानें, मी रस्त्याच्या एका बाजूनें जात असतांहि मजवर झडप घातली. मी ताबडतोब तेथें उभा राहून पोलीसास बोलावूं लागलों. आसपासचे मुसलमान लोक दिलगिरी प्रकट करूं लागले व मी पोलीसपर्यंत प्रकरण नेऊं नये असें मला विनवूं लागले. मला त्यावेळीं समजलें कीं त्यापूर्वींहि अशाच सोंगानें यावेळेप्रमाणेंच वाघाच्या खराखुराच आविर्भाव करून लोकांस दुखविलें होतें. अर्थात् मी तेथून हललों नाहीं. गर्दी जमूं लागली. साहजिकच पोलीस आले. मी त्यांना त्या सोंगाड्या वाघावर फिर्याद देण्याचा माझा मानस कळविला व त्याप्रमाणें रीतसर फिर्याद गुदरलीहि. गांवांत खळबळ झाली. हिंदुमहासभेचे लोक मला धन्यवाद देण्यासाठीं आले व मला बजावूं लागले 'पहा बरें, फिर्याद दिली हें ठीक; पण शेवटपर्यंत हिंमत राखा; आम्ही मदतीला आहोंत. मध्येंच कच खाऊं नका. नाहींतर तडजोड कराल !" मी त्यांना म्हणालों : 'माझी भूमिका तुम्हांला कां आवडली हें मी ओळखलें; पण रहदारीच्या रस्त्यानें निर्वेधपणें जाण्याच्या माझ्या रहिवाशीपणाच्या हक्काला बाध आला म्हणून मी फिर्याद दिली आहे. यांत हिंदु-मुसलमानांचा प्रश्न नाहीं.' तरीहि प्रतिपक्षी मुसलमान असल्यामुळें व त्यानें लांबून मुद्दाम एक मुसलमान वकील आणल्यामुळें मी कच खाणार व अखेर तडजोड करणार, असें त्यांनीं भाकीत केलेंच. मी सांगितलें, 'मी माझ्या सिद्धांताप्रमाणेंच फिर्याद लढविणार आहे.' एकदोन तारखा झाल्यावर आरोपितर्फेचे मुसलमान वकील माझी समजूत करण्यास आले. 'तुम्हीं गांधींचे व कॉंग्रेसचे मनुष्य असूनहि ही फिर्याद चालवीत आहांत, गांवांत तेढ वाढवीत आहांत हें बरें नव्हे.' अशा प्रकारें मला शिकवूं लागले. व शेवटीं म्हणाले : 'आमच्या पक्षकाराला जरी शिक्षा झालीच तरी तो तर नंगाच आहे, भोगील शिक्षा; पण तुम्ही मात्र हिंदु-मुस्लिम तेढ वाढवलीसें होत आहे हें बरें नव्हे !' मी त्यांना म्हणे : 'तुम्ही तुमच्या पक्षकाराच्या वतीनें मलाच उपदेश करण्याकरितां येतां याचें मला आश्चर्य वाटतें ! त्यालाच माझ्यापुढें नाक घांसण्यास कां आणीत नाहीं ?' अर्थात् तें शक्यच

नव्हतें. फिर्यादीच्या अनेक तारखा झाल्या. शेवटीं एका मध्यस्थानें फारच गळ घातली. मीहि माझ्या सिद्धांतानुसार विचार करीतच होतों. त्या विवाक्षित माणसास शिक्षा होण्यापेक्षां मुसलमान समाजाला या निमित्तानें कांहीं वळण लागण्यानेंच माझा कार्यभाग साधणार होता. अर्थात् मी सांगेन त्या अटींवर तडजोड करण्यास प्रतिपक्षाचे वकील तयार झाल्यामुळें मी तडजोड करण्यास तयार झालों. माझ्या अटी सांगितल्या व त्या मान्य झाल्यानंतर मी तडजोड करून फिर्याद मागें घेतली. ही बातमी गांवांत कळतांच हिंदुमहासभेच्या कुचेष्टेचा मी विषय झालों. 'आम्ही म्हणतच होतों कीं हे मुसलमान-धार्जिणे शेवटीं नांगी टाकणार! तसेंच झालें.' असे लोकप्रवाद सुरू झाले. प्रतिपक्षाचे वकील मजजवळ कबूल केलेल्या अटी पाळणार नाहींत असें त्यांनीं निश्चित भविष्य वर्तविलें. मी संथपणें उत्तरलों: 'त्याचें आजच प्रत्यंतर मिळणार आहे; त्याचाहि अनुभव घेण्याची माझी तयारी आहे.' पण अखेरीस सर्वांसच सानंद आश्चर्य वाटणारी गोष्ट घडून आली. आरोपीच्या वकीलानें कबूल केल्या-प्रमाणें सर्व अटी पाळल्या. मुसलमान मोहल्ल्यांत सभा घेतली. गॅसबत्त्या व बैठकीची तजवीज केली. इतकेंच नव्हे तर त्यांच्याच मुख्य भाषणांत त्यांनीं मुसलमान समाजाच्या मोहरमबाबतच्या सोंगाच्या प्रथेबाबत व इतर धर्मबाह्य चालीबाबत आपल्या समाजाची चांगली कानउघाडणी केली. शेवटीं माझ्या ठिकाणीं दुसरा कोणी इसम असता तर गांवांत हिंदु-मुसलमानांचा दंगा झाला असता असें सांगून त्यांनीं माझे आभार मानले. दिलेलें वचन त्यांनीं उत्कृष्टपणें पाळल्याबद्दल मीहि त्या वकीलाचे आभार मानले हें सांगणें नकोच. हा प्रकार पाहून दिलदार वृत्तीच्या हिंदु-महासभावाल्यांनाहि ही माझी पद्धति अगदीं योग्य व यशस्वी वाटल्याचें त्यांनीं बोलून दाखवलें. मी हें गांधीजींच्या पद्धतीचें यश मानतों.

हा अनुभव किरकोळ तर खराच; पण असे अनेकांचे अनेक अनुभव एकत्रित केल्यास त्यांवरून गांधीजींच्या अमोघ पण अहिंसक शस्त्राची व अत्यंत उपकारक व तेजस्वी विचारसरणीची जनतेस खात्री पटेल असें नाहीं का तुम्हांस वाटत?"

* * *

"तुमची 'सर्वधर्मसमभाव' ही शिकवण हिंदुधर्माला कमीपणा आणणारी आहे यांत शंकाच नाहीं—" आमची प्रार्थना ऐकल्यानंतर एका प्रामाणिक धर्मनिष्ठानें शंका काढली. "रामधुन म्हणतांना 'ईश्वर, अल्ला, तेरे नाम। सबको सन्मति दे भगवान्॥' असें तुम्ही म्हणतां तें ऐकवत नाहीं!"

"मुसलमानांच्याबद्दल हिंदूंचें मन अनुभवांनीं पोळलेलें आहे हें मी जाणतों. पण स्वतःस विचारी म्हणविणारांनीं विवेक राखला पाहिजे." मी सहानुभूतिपूर्वक म्हणालों.

त्यावर ठराविक टोमणा मिळालाच:

"हा सर्व विवेक आम्हांलाच शिकवा. मुसलमानांना शिकवण्याची तुमची हिंमत नाहीं."

"असें कां बरें म्हणतां? मुसलमान समाजांत वावरण्याची तुमच्यांत जी हिंमत आहे त्याच्या अनंतपटीनें जास्त आमच्यांत आहे. तुम्ही त्यांच्या-विरुद्ध नित्य द्वेषाची व त्वेषाची भाषा ओकीत असल्यामुळें तुम्हांला त्यांच्या वस्तींत व मोहोल्ल्यांत जाण्याचीहि भीति वाटते, मग तेथें वावरण्याची तर गोष्टच नको. आमचें तसें नाहीं. आम्ही निर्वेधपणें जाऊं शकतों. ईश्वर म्हणजे God असें घोकण्यास तुम्हांस संकोच वाटत नाहीं, मग ईश्वर म्हणजे अल्ला म्हणण्यास कां बरें संकोच वाटावा? कोणताहि धर्म असत्य, अनीति, दुराचरण करण्यास सांगत नाहीं. कांहीं धर्मांचे लोक चांगले व कांहीं धर्मांचे वाईट अशी वाटणी परमेश्वरानें केलेली नाहीं. खुद्द समर्थांनीहि म्हटलें आहे: "धर्मस्थापनेचे नर। तेहि विष्णूचे अवतार॥ (दासबोध, १०·४·।४२). अर्थात् सर्व धर्म मूलतः चांगलेच असा आमचा सिद्धांत आहे. हाच आमच्या सर्वधर्मसमभावाचा अर्थ. मुसलमान धर्माचे लोक अत्याचार करतात, पण हिंदू धर्माचे लोक अत्याचार करीत नाहींत, असें थोडेंच आहे? फार तर हिंदू इतकेंच म्हणतात कीं प्रथम मुसलमान लोक अत्याचार करतात, मग केवळ सूड म्हणून हिंदू करतात.

"मी मुसलमानांपुढें हा विषय काढला तर ते नेमकें उलटें सांगतात. तुम्ही म्हणाल 'चोराच्या उलट्या बोंबा!' तेहि तसेंच म्हणतील. हें घात-







चक्र कधीं संपणार ? हा अग्नि धुमसत राहिला तरच आमच्या पराक्रमाला संधि मिळणार असें उभय धर्मांचे लोक म्हणाले तर काय होईल ? 'मुसलमानेतरांवर अत्याचार करावेत असा आमच्या धर्मांचा आदेश आहे' असें मुसलमानहि सांगूं शकत नाहींत. तसा आदेश असणें शक्यहि नाहीं. 'इस्लाम' या शब्दाचा अर्थच 'शांति' असा आहे, 'रहिम' याचा अर्थच 'दया' असा आहे. तेव्हां इस्लाम धर्मांत अनीति व अत्याचार शिकवला असणें संभवत नाहीं!"

"अहो, तुम्ही अगदींच दुधखुळे आहांत. स्वधर्मीयांशीं दयाबुद्धीनें, न्यायनीतीनें वागा असें कुराण सांगत असेल; पण परधर्मीयांशींहि सहिष्णुतेनें वागावें, त्यांच्या स्त्रियांची अब्रू पवित्र मानावी असें सांगितलें असेल असें तुम्ही कशावरून समजतां ?"

"तुमचा प्रश्न मुद्द्याचा आहे. कुराणाची या बाबतींत काय शिकवण आहे हें सुबुद्ध व धर्मनिष्ठ मुसलमानांनींच जगाला समजाविलें पाहिजे. यांतच त्यांच्या धर्माची व समाजाची प्रतिष्ठा आहे हें तर खरेंच. पण मी माझ्यापरी, कुराणांतील असे वेंचे कोणी काढून देईल काय, या तपासांत व प्रयत्नांत आहे. पूज्य विनोबाजींनीं कुराणाचा मूळचा अर्थ समजून घेण्यासाठींच अरबी व फारशी भाषांचा खोल अभ्यास केलेला आहे. असे वेंचे प्रसिद्ध करण्याचा माझा विचार त्यांनाहि पटला असल्याचें त्यांनीं आपल्या ता. २५-१-१९४९ च्या पत्रांतून मला कळविलें आहे. त्यांना सवड मिळतांच ते हें काम करतील किंवा करीतहि असतील असा मला विश्वास आहे. मग तर तुमचें समाधान होईल ना ?"

* * *

शंकांचें समाधान शब्दांनीं करणें नेहमींच शक्य असतें असें नाहीं. समाधान करणाऱ्याचीहि तितकी पात्रता पाहिजे. शंकाशील माणसाचीहि समजून घेण्याची व तसें दिलदारपणानें कबूल करण्याची वृत्ति पाहिजे. तशी नसल्यास 'संशयात्मा विनश्यति।' असें म्हणून स्वस्थ बसण्याचा प्रसंग यावयाचा. शंकांचें खरें समाधान शब्दांनीं होत नसून प्रत्यक्ष कृतीनेंच होत असतें. अर्थात् हिंदूंनीं अत्याचार केले म्हणून मुसलमानांनीं केले काय, किंवा मुसलमानांनीं केले म्हणून हिंदूंनीं केले काय, व्यवहारतः दोहोंचा अर्थ एकच आहे. दोन्ही समाज जंगली जीवन जगत आहेत, मानवी नव्हे असेंच म्हणावें लागेल. हें घातचक्र संपावें असें ज्या समाजास प्रथम वाटेल तोच समाज माणुसकी-प्रधान आहे असें म्हणावें लागेल. कारण ठोशास ठोसा देणें, अत्याचाराला अत्याचारानें, व सूडाला सूडानें तोंड देणें हें उन्नत अवस्थेचें लक्षण खासच नव्हे. 'Tooth for a tooth, eye for an eye' हा जंगली सिद्धांत आहे; तो मानवी नवा सिद्धांत मानून कसें चालेल ?

> "O, it is excellent
> To have a giant's strength;
> but it is tyrannous
> To use it like a giant."

असें शेक्सपीयरचें एक सुंदर वचन आहे. 'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।' (गीता, ४·११) हा गीतेचा आधार देऊन कोणी कोणी हें वचन, जशास तसें, व ठोशास ठोसा या नीतीचें व सूडबुद्धीचें समर्थन करणारें आहे असें मानतात. त्यावर इतकेंच म्हणतां येईल कीं, त्या वचनाचा हा वाईटांतला वाईट अर्थ होय. मानवाची सारखी उत्क्रान्ति होत आहे. एक काळ असा होता कीं मतभेद मिटविण्याचा मार्ग म्हणजे द्वंद्वयुद्ध गणलें जाई; त्याचप्रमाणें 'बळी तो कान पिळी' असाहि एक काळ होता. त्या अवस्थेंतून आपली उत्क्रान्ति झाली नाहीं काय ? तंट्याचा किंवा मतभेदाचा प्रसंग येतांच मारामारी करणारांना आपण जंगली म्हणतों; त्यांना कोर्ट-कचेरींत किंवा पंचायतीपुढें जाण्यास आपण सांगतों; ही मानवांची उत्क्रान्तीच नव्हे काय ? वकीलीचा धंदा करणाऱ्या माणसांनीं तरी निदान हें मानलें पाहिजे, नाहींतर त्यांच्या धंद्याला स्थानच उरणार नाहीं. जी गोष्ट व्यक्तींना लागू आहे, तीच समाजांनाहि लागू आहे व तीच राष्ट्रांनाहि लागू आहे. असें असतां महात्माजींचा युद्धाविरुद्ध पुकारा व अहिंसेचा संदेश अप्रिय कां बरें वाटावा ?

* * *

महात्मा गांधींच्या पुण्याईमुळें, व त्यांच्या अखेरच्या बलिदानामुळें त्यांचा सत्य-अहिंसेचा संदेश जगाला स्वीकारावा लागेल अशींच सर्व लक्षणें दिसत आहेत.



अनुक्रमणिका








पाकिस्तान स्थापन झाल्यानंतर "पाकिस्तानच्या दरबारापुढें सर्व धर्मांचे लोक समान आहेत" अशी घोषणा जिनासाहेबांनीं केली हें गांधींच्या तत्त्वाचेंच यश नव्हे काय ? कोणी शंकेखोर म्हणेल कीं ते शब्द त्यांनीं केवळ ओठांतूनच उच्चारले असले पाहिजेत, पोटांतून नव्हे. यावर इतकेंच उत्तर देतां येईल कीं, ओठांतूनहि उच्चारावे लागले हेंहि गांधींच्याच तत्त्वज्ञानाचें यश होय.

ज्या दिवशीं मुसलमानांकडून होणाऱ्या अत्याचारांविरुद्ध हिंदूंनीं ओरड करण्यापूर्वी प्रथम मुसलमान समाजाचे विचारवंत पुढारीच ओरड करतील व आपल्या समाजाचे कान उपटतील, व ज्या दिवशीं हिंदूंच्याकडून होणाऱ्या अत्याचारांबद्दल हिंदू पुढारीहि तसेंच करतील, तो सोन्याचा दिवस होय. तो दिवस जवळ येऊं लागला आहे हें खास. "पाकिस्तानांत गादी-तक्क्यांवर लोळून हिंदुस्थानांतील मुस्लिमांची काळजी करणारेच हिंदुस्थानांतील मुस्लिमांचे कट्टे शत्रु आहेत. ...पाकिस्तानच्या घोषणा आम्हीच केल्या. परंतु आम्हांस त्यांचें खरें स्वरूप कळल्यानें आमच्या चुका कळून येत आहेत"– अशीं जाहीर भाषणें जबाबदार मुसलमान करूं लागले ही गोष्ट तो सोन्याचा दिवस जवळ येऊं लागला आहे असेंच सिद्ध करीत नाहीं काय ?

तसेंच गांधींचा खून करून गांधींचें तत्त्वज्ञान तर मरत नाहींच; पण उलट आपल्याच उच्च म्हणविल्या जाणाऱ्या प्रिय संस्कृतीला काळिमा लागतो ही गोष्ट गांधीद्वेषी हिंदु समाजास जितकी लवकर पटेल तितक्याच लवकर हिंदु समाजाला तो सोन्याचा गोड दिवस पाहण्याचें सद्भाग्य लाभेल.

एवंच, जों जों गांधीजींच्या शिकवणीचा विचार करावा तों तों त्यांचे माझ्या स्वतःवर, जगावर व अखिल मानवप्राण्यांवर जे उपकार झालेले आहेत ते फिटणें शक्य नाहीं असेंच वाटूं लागतें. आपापल्यापरी हे उपकार फेडण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करणें यांतच आपलें व समाजाचें कल्याण आहे.

---

## "रामनाम"

गांधीजींनीं लिहिलें आहे : "अगदीं लहानपणीं भुताखेतांची भीति घालविण्याकरितां मी 'रामनामा'चा जप करूं लागलों. अर्थात् ही संवय फार काळ टिकली नाहीं. परंतु बालपणीं जें संस्काराचें बीं पेरलें गेलें तें फुकट गेलें नाहीं. मला वाटतें, त्या रंभाबाईच्यामुळें, आज रामनाम माझ्या आयुष्यांत एक अमोघ शस्त्र बनलें आहे." लहानपणचें हें संस्कारबीज गांधीजींच्या नेणत्या ( Subconscions ) जीवनाचा एक भागच बनलें. या संस्काराचें पृथक्करण त्यांनीं कधीं केलें नाहीं; त्या संस्काराचाच कायापालट घडवून त्यांनीं आपल्या जीवनांतील विजयाचा कळस गांठला !— 'रामनामां'त महिमा नव्हता; रामनाम उच्चारणाऱ्या महात्म्यांत तो महिमा होता ! या महात्म्याची किमयाच अशी होती कीं, त्याच्या संस्पर्शानें साध्याभोळ्या धार्मिक कल्पनांमधूनही अमृताचा अर्कच स्रवत असे.

—ई. स्टॅन्ले जोन्स

'Mahatama Gandhi : an Interpretation' पान १७.



अनुक्रमणिका







श्री. वालजी गोविन्दजी देसाई

# दासांचा दास

' ज्यांना तुमच्या मंडळांत प्रधानपद पाहिजे असेल, त्यांनीं तुमचे दास व्हावयास पाहिजे. '

—मॅथ्यू, २०–२७.

' दास कहावन कठिन है, मैं दासनको दास ।
अब तो ऐसा हो रहूँ कि पांवतलेकी घास ॥

—कबीर

( ' दास म्हणवून घेणें कठीण आहे. मी दासांचा दास आहे. आतां तर माझी अशी इच्छा आहे कीं, मी पायतळींचें गवत व्हावें. )

*माझा ताप गेल्यानंतर एक दिवस संध्याकाळीं फिरायला जायच्या तयारींत असलेले बापू आपल्या नियमानुसार मला बघायला आले. तेव्हां मी त्यांच्याजवळ रात्रीं बाहेर निजण्याबद्दल परवानगी मागितली. बापूंनीं ती दिली.

थोडा वेळ गेला तरी बापू अजून तसेच उभे आहेत असें मला दिसून आलें. मी त्यांच्याकडे पाहिलें. ते मला खाटेवरून उठायची खूण करीत होते. कशाकरितां ते मला हें सांगत आहेत, तें मला कांहींच समजेना! परंतु तें कारण न समजतांही केवळ त्यांची आज्ञा पालन करण्यासाठीं म्हणून मी हळूहळू खाटेवरून उठून उभा राहिलों. आतां मी सहज उभा राहूं शकत होतों. तरी बापूंनीं मला आधार दिला आणि एका चटईवर नेऊन मला बसविलें. नंतर बापू माझ्या खाटेपाशीं गेले आणि माझें अंथरूण गोळा करूं लागले.

मी फारच गोंधळून गेलों !

" बापूजी तें राहूं द्या, मीं सगळें करून टाकीन." मी आग्रहपूर्वक म्हटलें.

परंतु बापूंनीं त्याकडे लक्ष दिलें नाहीं. बिस्तरा गुंडाळून त्यांनीं तो चटईवर ठेवला आणि माझी खाट उचलून दारांतून ते बाहेर पडले !

मीं मनांत फारच ओशाळून गेलों ! मला वाटलें, कोठल्या कुमुहूर्तावर मी आपली बाहेर निजायची इच्छा प्रदर्शित केली !

परंतु यापेक्षांही आश्चर्य पुढें दिसूं लागलें ! चटई-वर बसून मी आपला पहात होतों. महादेवभाई कोठेंसें जात होते, ते थांबले आणि हा प्रकार बघत राहिले. त्यांच्यापासून थोड्या अंतरावर मीराबहेन उभ्या होत्या. त्याही हें दृश्य बघतच राहिल्या ! दोघेंही पहात होतीं पण कोणीही बापूंच्या हातांतून खाट घ्यायला पुढें धावलें नाहीं ! एखाद्या पुतळ्या-प्रमाणें निश्चल होऊन दोघेंही हें दृश्य पहात होतीं ! बापूंच्या कामांत हस्तक्षेप करावयाचा कोणालाही धीर होत नव्हता हें स्पष्ट दिसत होतें !

दारांतून तीनचार पायऱ्या खालीं उतरून ती खाट उचलून घेऊन जाणें हें बापूंना सोपें नव्हतें

* सुमंगलप्रकाशजी, दांडीयात्री, यांनीं हिंदींत ' बापू के साथ ' नांवानें गांधी-भागवत प्रकट केलें आहे, त्यांतून हा प्रसंग घेतला आहे. —वा. गो. दे.






मला तर वाटलें, बापू पडणार तर नाहींत! महादेवभाई आणि मीराबहेन ह्यासुद्धां तितक्याच चिन्तातुर दिसल्या! परंतु बापू न पडतां सहीसलामतपणें खाट उचलून खालीं उतरवून ती घेऊन गेले. महादेवभाई आणि मीराबहेन आपापल्या कामाला निघून गेलीं.

खाट अंगणांत ठेवून बापू माझें अथरूण घ्यायला आले. मी त्यांना आर्जवपूर्वक विनवून म्हटलें: "बापूजी, राहूं द्या ना! मी माझा बिस्तरा घालून घेईन." परंतु बापूंजींना त्या दिवशीं मौन होतें. म्हणून त्यांनीं मान हलविली आणि माझा सबंध बिस्तरा उलगडून त्यांतील प्रत्येक वस्तु अलग घेऊन जाऊन माझें अंथरूण व्यवस्थितपणें खाटेवर घातलें! प्रथम सतरंजी घऊन ती जोरानें त्यांनीं दोनदां झटकली, ती खाटेवर अंथरली, घड्या पडलेल्या होत्या त्या त्यांनीं हातांनीं साफ केल्या; नंतर कांबळें बाहेर नेऊन तें झटकलें व तें सतरंजीवर अंथरलें.

माझी अंथरुणावरील चादर आणि उशीचा अभ्रा दोन्हींही मळून गेलेलीं होतीं. दुहेरी असलेली चादर बापूंनीं उलट झटकून टाकली आणि पुन्हां ती अशी दुहेरी केली कीं मळलेला भाग आंत गेला! ती चादर त्यांनीं उशीवरही पसरली त्यामुळें उशीचा मळलेला भागही डोळ्याआड होऊन दिसेनासा झाला!

नंतर बापू पुन्हां आंत आले, मला सांवरीत पायऱ्या उतरून मला माझ्या शय्येवर घेऊन गेले.

---

## समुखे शांति पारावार—

असें म्हणतात कीं आपलें मरण होईल तेव्हां म्हटली जावी म्हणून गुरुदेव ठाकूर यांनीं "समुखे शांति पारावार" ही कविता रचली होती. ती पुढें 'गुरुदेव' मासिकाच्या स्वातंत्र्यादिनांकांतून श्री. मनोहर यांनीं केलेल्या अनुवादासह, कांहीं स्थळीं सुधारून उद्धृत केली आहे:

समुखे शांति पारावार,
  भासाओ तरणी, हे कर्णधार।
तुमि हबे चिरसाथी
  लओ, लओ हे क्रोडपाति।
असीमेर पथे ज्वालिबे
  ज्योतिर ध्रुव तारका।
मुक्तिदाता! तोमार क्षमा, तोमार दया,
  हबे चिरपाथेय चिर यात्रार।
हय येन मर्त्येर बन्धनक्षय,
विराट विश्व बाहु मेलि लय,
पाय अन्तरे निर्भय परिचय
  महा अजानार।

[ समोर शांतीचा अपार सागर,
हांकारी नाव, हे कर्णधार!
तूंच व्हावेंस चिर सहचर,
घेई, घेई तव अंकावर।
असीमाच्या पंथीं चमकतो
प्रकाशाचा ध्रुव तारा तो।
तुझी क्षमा, तुझी दया, हे मुक्तिदाता!
चिर शिधोरी ही चिरप्रवासा निघतां।
मर्त्य बंधनाचा जणुं क्षय होवो,
विराट विश्व बाहूमध्यें घेवो,
अंतरीं निर्भय परिचय पावो
महान् अज्ञेयाचा। ]

---











अनुक्रमणिका

श्री. ह. कृ. मोहनी

# म. गांधींचें अनुयायित्व यथार्थ कसें होईल?

म. गांधींच्या निर्याणास पावणेदोन वर्षें लोटलीं आहेत. महात्माजींचें जीवन अनन्यसाधारण होतें, एवढेंच नाहीं तर त्यांत एक प्रकारची दिव्यता भरून राहिलेली होती. अवतारी विभूतीसारखें महात्माजींचें चरित्र होतें असें त्यांच्या मृत्यूनंतर अतिशयोक्ति न करतां आतां म्हणतां येण्यासारखें आहे. हिमालयासारखें भव्य, विशाल व उंच असें त्यांचें महात्मेपण होतें. आणि म्हणूनच त्यांच्या मृत्यूमुळें भारतीयांच्या जीवनांत झालेली हानि लवकर भरून येण्यासारखी नाहीं.

भगवान् गौतमबुद्ध किंवा प्रभु येशू ख्रिस्त या थोर जगज्जेत्या धर्मसंस्थापकांशीं तुलना करितां येण्यासारखें गांधीजींचें विभूतिमत्त्व होतें. बुद्ध आणि ख्रिस्त यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाभोंवतीं कित्येक गूढ व अद्‌भुत दंतकथांचें रान माजलेलें आहे. तथापि त्यांच्या धर्ममताचा प्रभाव जगभर पडलेला आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. ह्या अलौकिक विभूतींच्या वेळचें जग आजच्या जगापेक्षां लहान व संकुचित होतें. गांधीजींचें जग त्या वेळच्या जगाच्या तुलनेनें पहातां फार मोठें, विस्तृत, व गुंतागुंतीचें आहे. तथापि आज गांधीजींच्या विचाराचा कुतूहलजनक परिणाम जगभर झालेला दिसत आहे. गांधीजींच्या वैचारिक प्रभुत्वामुळें हिंदुस्थानचें नांव अखिल जगतांत ऐकूं येत आहे. गांधीजींमुळें हिंदुस्थानची किंमत व इभ्रत अनेक पटींनीं वाढलेली आहे.

## बुद्धाचा धर्मविचार वैयक्तिक निर्वाणासाठीं

भगवान् बुद्धाचें जगत् निराळें होतें. त्यांच्यापुढील प्रश्न व विचार त्यावेळच्या जगास जरी व्यापून टाकणारे असले आणि आपल्या महान् व्यक्तिमत्त्वामुळें त्या काळच्या धर्मविचारांत जरी क्रांतिकारक बदल त्यांनीं केलेला असला तरी ते प्रश्न वैयक्तिक स्वरूपाचेच होते असें आज म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. आपल्या स्वतःवर आणि सर्व लोकांवर दुःखाची तरवार सारखी लटकत आहे अशी भगवान् बुद्धास प्रचीति आली, आणि ही दुःखनिवृत्ति कशी करावी हा ध्यास त्या महापुरुषास लागला. विचार करितां करितां, त्यावेळच्या मतमतांतरांचें मंथन करून, अनेक प्रकारच्या तपश्चर्येनें चित्ताची शुद्धि केल्यानंतर चार आर्य तत्त्वें भगवान् बुद्धानें शोधून काढलीं: दुःख, समुदय, निरोध व मार्ग हीं तीं चार आर्य तत्त्वें आहेत. दुःख म्हणजे काय, दुःखाचें मूळ काय, दुःखाच्या कारणांचा कशानें निरोध होतो व तें दुःख नष्ट करण्याचा मार्ग काय हे प्रश्न ह्या चार आर्यतत्त्वांत ग्रथित केले आहेत. दुःखाच्या पांच मूलभूत कारणांचें अवगाहन करून, दुःखाचा निरोध करण्याचे आठ मार्ग बुद्धानें सांगितले. वेदना, विज्ञान, संज्ञा, संस्कार व रूप हीं दुःखाचीं पांच मुख्य कारणें गौतमबुद्धानें विचारपूर्वक ठरविलीं. सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्म, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति व सम्यक् समाधि हे ते आठ मार्ग आहेत. ह्या भगवान् बुद्धाच्या अष्टांगिक मार्गाला मध्यम मार्ग असें म्हणतात. ही साधना केल्यास भगवान् बुद्धाच्या मतानें मनुष्यास निर्वाणप्राप्ति होते, त्याची सुखदुःखविषयक भ्रांति फिटते व अर्हत् पदाचा जीवास लाभ होतो. निर्वाण हें बुद्धाचें अंतिम ध्येय होतें. दुःखनिवृत्तीकरितां हें ध्येय अंगीकारण्याची त्यास जरूरी होती; आणि मध्यम मार्गानें मनुष्यमात्रास ही ध्येयप्राप्ति होऊं

शकते ह्याचा साक्षात्कार भगवान् बुद्धास होऊन चुकला होता. भगवान् बुद्धाचें सर्व नीतिशास्त्र अर्हत्-पदप्राप्तीच्या अनुषंगानें निर्माण झालेलें आहे. सम्यक् कर्म अथवा हिंसा, चोरी न करणें, हें निर्वाणासाठीं अष्टांग-मार्गीपैकीं एक साधन आहे.

भगवान् बुद्धाच्या जगद्विजयी विचारसरणीचा मुख्य भर अतींद्रिय ज्ञानावर नसून नीतिमत्तेवर होता हें खरें आहे. जग शाश्वत आहे कीं अशाश्वत आहे, जगाला अंत आहे कीं तें अनंत आहे, जीव व शरीर एक कीं निराळीं, तथागत निर्वाणानंतर असतो कीं नसतो अशा प्रकारच्या प्रश्नांना गौतमबुद्ध उत्तरें देत नसे. तृष्णेचें समूळ उच्चाटन केलें म्हणजे मनुष्य सर्व दुःखापासून मुक्त होतो आणि तो अर्हत्-पद प्राप्त करून घेतो हें बुद्धाच्या शिकवणुकीचें सारसर्वस्व आहे. अर्हत्-पदास साधनीभूत होणारी गौतमबुद्धाची नीतिमत्ता आहे, आणि बुद्धाचा धर्मविचार वैयक्तिक मुक्तीसाठीं, निर्वाणासाठीं आहे.

## खिस्ताची साधना अतींद्रिय अवस्थेकरितां

गांधीजींच्या मताचा प्रभाव गौतमबुद्धाच्या किंवा प्रभु येशूच्या धर्मविचाराप्रमाणें विस्तृत आहे. आधुनिक, सुधारलेलें असें म्हटलें जाणारें जगत् विज्ञाननिष्ठ असल्यामुळें गांधीजींच्या मताचा परिणाम ह्या वैज्ञानिक जगावर झालेला दिसत आहे, ही कांहीं कमी महत्त्वाची घटना नाहीं. गांधीजींचें व्यक्तिमत्त्व जरी मुख्यतः धार्मिकतेच्या सदरांत पडत असलें, तरी भगवान् बुद्ध किंवा प्रभु येशू यांच्या धर्मविचाराप्रमाणें त्यांच्या मताचा भर वैयक्तिक मुक्तीवर किंवा अतींद्रियतेवर दिलेला नाहीं. खाइस्ट् म्हणजे परमेश्वराचा पुत्र आहे अशी खिस्ती धर्मानुयायांचीच श्रद्धा आहे असें नाहीं, तर खुद्द येशूनेंच 'परमेश्वराचा पुत्र' ही पदवी स्वतःकडे लावून घेतलेली होती. येशूनें धर्माच्या क्षेत्रांत व्यक्तिविषयक देवास फार महत्त्व दिलेलें आहे. ईश्वर आणि मनुष्यप्राणी ह्यांमधील संबंध दोन मनुष्यप्राण्यांतील परस्परप्रेमासारखा आहे. मनुष्यानें स्वर्गांतील देवाच्या किंवा आकाशांतील बापाच्या राज्यांत प्रवेश मिळविण्याकरितां खटपट करणें हें मनुष्यजातीचें धार्मिक ध्येय आहे. ह्या स्वर्गांतील राज्यांत नम्रता, दयाळुत्व, पावित्र्य, कळकळ या गुणांना फार मान आहे. शेजाऱ्यांबद्दल प्रेम असावें, शत्रूंनाहि क्षमा करावी, दान गुप्तपणानें द्यावें; कारण ईश्वराच्या राज्यांत प्रवेश मिळविण्यासाठीं ह्या सद्गुणांशिवाय दुसरें साधन नाहीं. पापी मनुष्याला त्याचें पाप नाहींसें करून दैवी जीवन प्राप्त करून देणारें साधन म्हणजे खिस्ती नीतिशास्त्र किंवा धर्मसंप्रदाय हें आहे. ह्या धर्माची दीक्षा घेतली म्हणजे त्या मनुष्याला दुसरें दैविक जीवन प्राप्त होते अशी खिस्ती धर्मानुयायांची श्रद्धा आहे. खिस्ती धर्म म्हणजे खिस्तद्वारा मनुष्याचा व देवाचा संबंध जुळवून देणारा धर्म आहे. हा संबंध जुळविण्यासाठीं नीतितत्त्वांचे निर्बंधही आवश्यक अशी बाब आहे.

ज्यू लोकांत परमेश्वर हा सर्व जगाचा पिता आहे असें मानीत. खिस्त हा प्रेषित असून तो परमेश्वराचा पुत्र आहे असें ते समजत. आत्मतत्त्व किंवा 'स्पिरिट' हें देखील ह्या धर्मांत समाविष्ट केलेलें एक महत्त्वाचें तत्त्व आहे. एकमेवाद्वितीय असा परमेश्वर ह्या नश्वर व सांत जगतांत खिस्ताच्या अंशरूपानें अवतरलेला असून सर्व मनुष्यजातीमध्यें तो आत्मरूपानें वास करितो. अशा रीतीनें परमेश्वर, पुत्र व आत्मतत्त्व किंवा स्पिरिट ह्या तिन्हीं मतांची सांगड घातली म्हणजे 'डॉक्ट्रिन् ऑफ ट्रिनिटी'—त्रैताचें तत्त्व, त्रिमूर्ति बनते. खिस्ती धर्मांत ह्या ट्रिनिटीच्या तत्त्वास फार महत्त्व आहे. खिस्त हा स्वतःच्या अपराधाकरितां सुळीं गेला नसून मनुष्यजातीच्या पापाच्या उद्धारासाठीं बळी गेला. खिस्त हा पापी लोकांचें पाप धुऊन काढणारा देवाचा दूत आहे अशी खिश्चन धर्माच्या लोकांची समजूत आहे. ह्यासच ते 'डॉक्ट्रिन ऑफ दि क्रॉस' असेंहि म्हणतात. खिस्त हा स्वार्थत्यागाचा अत्युच्च आदर्श असून त्यागाची परमोच्च कल्पना खिस्तामध्यें केंद्रित झालेली आहे. खिस्ती धर्मामध्यें शत्रूंनीं केलेला अन्याय सहन करावयाचा असतो. त्याचा प्रतिकार करणें योग्य ठरत नाहीं. कारण ईश्वराला हें रागद्वेषविरहित सहिष्णुत्व मान्य आहे; आणि ईश्वरतुष्टीसाठीं पापी लोकांचें पाप साधुपुरुषास शिरावर घेणें भाग आहे.










# म. गांधींचें अनुयायित्व यथार्थ कसें होईल ?

## नीतिमत्ता सत्याग्रहाचें साधन

एकंदरींत पहातां भगवान् बुद्धाचें सम्यक् कर्म किंवा अहिंसा आणि प्रभु येशूची दया, करुणा व सहिष्णुता हे गुण एका अत्युच्च धार्मिक स्थितीच्या सिद्धीसाठीं साधनीभूत असे आहेत. प्रभु येशूची ही सात्त्विकता अतींद्रिय अवस्थेसाठीं अंगीकारलेली आहे; तर भगवान् बुद्ध निर्वाणपदप्राप्तीसाठीं ह्या गुणांची साधना जरूर आहे असें समजतात. ह्या दोन्ही ध्येयांमधील अंतर फार सूक्ष्म आहे. महात्मा गांधींनीं देखील अहिंसेस व सात्त्विक गुणास सार-सर्वस्व मानलेलें आहे. सात्त्विक गुण हाच महात्माजींच्या उपदेशाचा पाया आहे. अहिंसेचा सात्त्विक गुणाचा उपदेश हा सर्वव्यापी आहे; कारण अहिंसा हा परम धर्म आहे. बुद्ध व खिस्त ह्या धर्मावतारांचा उपदेश गांधीजींनीं निराळ्या क्षेत्रांत उपयोगांत आणल्यामुळें त्यांचें व्यक्तिमत्त्व विश्वव्यापक झालेलें आहे. ज्याप्रमाणें बुद्धधर्म व खिस्तीधर्म हा नीतिमत्तेस प्राधान्य देतो, त्याचप्रमाणें गांधीजींसारख्या महानुभावांचा नीतिमत्ता हाच एकमेव आधार आहे. परंतु ह्या नीतिमत्तेस, सात्त्विक गुणास, निर्वाण अवस्था, मुक्ति किंवा ईश्वरसायुज्यता ह्याचें साधन न बनवितां देशकालवर्तमान पाहून गांधीजींनीं ही नीतिमत्ता सत्याग्रहाचें साधन बनविली आहे. सत्य हाच गांधीजींचा ईश्वर आहे. गांधीजींचें सत्य ही अतींद्रिय अवस्था नाहीं. कोणाहि कळकळ बाळगणाऱ्या मनुष्यप्राण्याच्या हातांत सांपडणारें स्थिर असें तें तत्त्व आहे.

## सत्याग्रहाचें मंगल शस्त्र

गांधीजींनीं नीतिमत्ता ही सत्याग्रहाचें साधन बनविली खरी; पण सत्याग्रह तरी कशाकरितां करावयाचा, सत्याग्रहाचा तरी हेतु काय ह्या प्रश्नाचें उत्तर देणें जरूर आहे. सत्याग्रहाचा उद्देश अन्याय-निवारण हा आहे. हें अन्यायनिवारण अहिंसात्मक साधनानें देखील होऊं शकतें, हें महात्मा गांधीजींनीं स्वोदाहरणानें प्रथमच जगास दाखवून दिलें. सामाजिक अन्याय दूर करण्यास हिंसात्मक साधनाशिवाय तरणोपाय नाहीं ही जी विचारी जनतेची अनेक शतकांच्या शिकवणुकीमुळें दृढमूल झालेली समजूत होती, ती समजूत सर्वस्वीं खरी नाहीं, हें गांधीजींनीं पटविण्याचा प्रयत्न जन्मभर केला. हीच त्यांच्या महान् व्यक्तिमत्त्वाची विशेषता आहे. पददलित, असहाय, निःशस्त्र, अन्यायानें त्रस्त झालेल्या लोकांनीं अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठीं सत्याग्रहाचें शस्त्र हातीं परजण्यासारखें आहे. ह्या मंगलमय शस्त्रानें शस्त्रधाऱ्यांमध्यें मानव्याचें पौरुषयुक्त गुण नव्यानें अवतीर्ण होतात, ह्या आत्मिक बलाच्या शस्त्रानें स्वाभिमानादि मानवी गुणांची दीप्ति अनेकपट वाढते; एवढेंच नाहीं तर, ज्यांच्याविरुद्ध हें शस्त्र वापरलें जातें त्यांचाहि गुणप्रकर्ष होतो. त्यांचा हृदयपालट होऊन तेहि उन्नत होतात, देवत्व त्यांच्यामध्यें देखील कांहीं प्रमाणांत स्फुरण पावतें. असुरांस मनुष्य बनविण्याची किमया ह्या सत्याग्रह शस्त्रामध्यें अंतर्भूत झालेली आहे, हें जगाच्या इतिहासांत प्रथमच दाखवून देणारे महात्मा गांधी हे महापुरुष आहेत.

महात्मा गांधींनीं सहिष्णुता, अक्रोध, क्षमा, दया, अहिंसा ह्या गुणांची जोपासना व्यक्तीच्या उन्नतीसाठीं केली पाहिजे, हीच केवळ शिकवणूक दिलेली नाहीं, तर ह्या गुणांची जोपासना, इतरांच्या, अज्ञानानें शत्रू वाटणाऱ्या लोकांच्याहि हृदयपालटासाठीं, त्यांच्या शाश्वत कल्याणासाठीं, केली पाहिजे. सत्याग्रहाचें पाणी ह्या व्यक्तिगत, सात्त्विक, अक्रियात्मक (Passive) पण प्रभावी गुणास दिल्यास दुधारी तरवारीसारखी कार्यक्षमता ह्या गुणामध्यें निर्माण होऊं शकतें, हें दाखवून दिलेलें आहे. सहिष्णुता, अक्रोध, अहिंसा ह्या गुणांचें चीज व्हावयाचें तर आकाशांत राहणाऱ्या ईश्वरावर सर्वस्वीं भार टाकण्यावांचून गत्यंतर नाहीं. भविष्यकाळांत केव्हां तरी ईश्वर पुनरुत्थान करून सर्व प्राण्यांना मोक्षपदास नेऊन पोंचवीपर्यंत हुतात्म्यांनीं सहनशीलतेनें दुष्टांचे सर्व अन्याय पोटांत घालणें जरूर आहे, ही खिस्ताची शिकवणूक महात्माजींनीं अधिक कार्यक्षम केली आहे. ह्या गुणांचा इष्ट परिणाम ह्या भौतिक जगांतच दिसणें शक्य आहे. ही नवीन स्फूर्तिदायी आशा गांधीजींनीं स्वार्थत्यागी लोकांच्या सात्त्विक हृदयांत






जागृत केली आहे. सात्त्विक गुण सामाजिक अन्याय-निवारणासाठीं उपयोगीं पडूं शकतात, हें सत्याग्रहाच्या शिकवणुकीनें गांधीजींनीं सिद्ध केलें आहे. सत्याग्रहासाठीं ह्या गुणांचा उपयोग केल्यास, ईश्वराचेंच तें कार्य आहे, ह्या गुणांकडून सत्याग्रहाच्या रूपानें ईश्वरच जनतोद्धाराचें कार्य घडवून आणतो, हा गांधीजींचा ह्या युगासाठीं नवीन धर्म आहे.

सात्त्विक गुणांची ढाल घेऊन सत्याग्रही शस्त्रानें लढणारे महात्मा गांधी हे नवयुगांतील अद्वितीय सेनानी होते. असहकार, सविनय कायदेभंग, व उपवास हा एक त्रिशूल आहे आणि ह्या त्रिरूपांच्या एकीकरणामुळें सत्याग्रहाचें शस्त्र बनलेलें आहे. गांधीजींचें व्यक्तिमत्त्व ईश्वरनिष्ठा, परोपकार, व सात्त्विक गुण ह्यांतच केवळ सर्वस्वीं सांठविलेलें नाहीं. अध्यात्म, साधुत्व व मुत्सद्दीपणा ह्या तिन्ही प्रकारच्या अलौकिक गुणांच्या मनोहर मिश्रणाचें गांधीजींच्या हृदयांत एकजिनसी रसायन बनलेलें होतें हें खरें; तथापि येवढ्यानेंहि गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाचें वर्णन पुरें होऊं शकत नाहीं. अद्भुत वीरता आणि असाधारण पराक्रम हाहि गुण गांधीजींमध्यें प्रकर्षानें वास करीत होता. हा त्यांचा पराक्रम अहिंसात्मक होता. अहिंसा सत्याग्रहाचें स्वरूप धारण करून गांधीजींच्या हृदयांत समाविष्ट होऊन लढत होती, हें अद्भुत व असाधारण दृश्य महात्मा गांधींनीं प्रथमच जगापुढें दाखविलें आणि ह्यांतच त्यांचें अद्वितीय व्यक्तिमत्त्व दृग्गोचर झालें आहे.

ह्या सत्याग्रही वीरतेचा साक्षात्कार गांधीजींस आफ्रिकेमध्यें झाला. वंशभेद, साम्राज्यशाही, आर्थिक जुलूम व गुलामगिरी ह्या घोर अन्यायांविरुद्ध गांधीजींस आफ्रिकेमध्यें लढावें लागलें. नंतर इंग्रजी साम्राज्यशाही, भयंकर आर्थिक पिळवणूक आणि सांस्कृतिक विनाश ह्या हिंदुस्थानांतील पाशवी आपत्तींविरुद्ध हें सत्याग्रहाचें शस्त्र ह्या थोर महात्म्यानें परजलें.

## सत्त्वगुणी लोकांचें आशास्थान

सत्याग्रही शस्त्रप्रभावानें, निःशस्त्र, पददलित लोकांना राजकीय स्वातंत्र्य मिळवितां येण्यासारखें आहे ही आशा महात्मा गांधींनीं सत्त्वगुणी लोकांच्या हृदयांत प्रथमच जागृत केली. आणि ज्याअर्थी पसतीस कोटी अर्धशिक्षित व असंस्कृत लोकांस सत्याग्रहाच्या शस्त्रानें एका बलाढ्य, शिस्तबाज, साम्राज्यशाहीशीं युद्ध करून विजय मिळविण्याची संभवनीयता उत्पन्न होऊं शकते, त्या अर्थी ह्याच अलौकिक शस्त्राच्या बळावर जागतिक युद्धेंहि बंद करितां येणार नाहींत काय असा प्रश्न आस्थेनें निर्माण होण्याइतका सद्विचाराचा प्रभाव महात्माजींच्या तीस वर्षांच्या हिंदुस्थानांतील लोकविलक्षण आंदोलनामुळें दिसावयास लागला. महात्माजींच्या चारित्र्याची हीच दिव्यता आहे.

जगांत आर्थिक जुलूम, वंशभेदमूलक घोर अन्याय, राष्ट्रीयतेच्या नांवाखालीं चाललेला आसुरी स्वार्थ अशासारख्या अनेक घोर अनर्थांनीं धुडगुस घातलेला आहे. राष्ट्राराष्ट्रांतील भयंकर विनाश करणाऱ्या युद्धांनीं ह्या आपत्तीस सीमा राहिलेली नाहीं. गांधीजींचा विधायक कार्यक्रम अनेकावयवी असला तरी त्याचा मुख्य हेतु ह्या युद्धपिपासेवर परिणामकारक उतारा शोधून काढणें हा आहे. सत्याग्रहानें हे अनर्थ टळूं शकतील अशी अंधुक आशा गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वामुळें जगांत निर्माण झाली आहे.

गांधीजींचें खरें अनुयायित्व हें केवळ परोपकारी कार्यांत किंवा सात्त्विक गुणांची वाढ करणाऱ्या नुसत्या लोकसेवाव्रतांत नाहीं. तें अनुयायित्व सत्याग्रहाच्या वैयक्तिक व सामाजिक तयारीमध्यें समाविष्ट झालेलें आहे. आर्थिक, सामाजिक व राजकीय नैर्घृण्य, अन्याय व जुलूम—यांविरुद्ध सत्याग्रही सेना ज्या प्रमाणांत व ज्या संख्येनें तयार होईल, त्या प्रमाणांत गांधीजींचें अवतारकृत्य सफळ होऊं शकेल. सत्याग्रहाच्या तयारीवांचून, जुलुमजबरदस्तीविरुद्ध प्रतिकार केल्यावांचून गांधीजींचें अनुयायित्व सार्थ व परिणामकारक होऊं शकत नाहीं. लाकडाच्या बाणास ज्याप्रमाणें पोलादी पातें असतें आणि बाणाची कार्यक्षमता व वेग ज्याप्रमाणें ह्या पात्याशिवाय वाढूं शकत नाहीं, त्याप्रमाणें सत्याग्रहाशिवाय कोणत्याहि प्रकारचे जागतिक अन्याय, नुसत्या सात्त्विक गुणांच्या जोरावर नष्ट होऊं शकणार नाहींत. गांधीजींचें अनुयायित्व हें या अर्थानें अत्यंत क्रांतिकारक आहे.








# कविता आज निराळी

कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी।
कधिं अश्रूंपरि कोमल अन् कधिं उग्र भयंकर काली ॥
ही दलितांची ही पतितांची
ही श्रमिकांची अन् व्यथितांची
समता, शुचिता आणिक शांति प्रस्थापीत निघाली
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी ॥ १ ॥
वत्सल ही क्षुधितांना भरविल
अनिकेतांना कुशींत घेइल
कोसळून मत्तांचें आसन ही तडितेपरि जाळी
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी ॥ २ ॥
ही भंग्यांघरिं गाइल गाणां
पुशील अन् डोळ्यांतिल पाणी
निज केसांनीं झाडिल अंगण, ही त्यांची कैवारी
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी ॥ ३ ॥
गाइल ही संतांचा गौरव
अन् जीवन-वीरांचें वैभव
रेखिल स्वप्नें नक्षत्रांनीं आणि नभाच्या भाळीं
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी ॥ ४ ॥
विमोचनास्तव ही विश्वाच्या
झुंजुनि आणिल कलश सुधेचा
विनतेसम जनतेचें जीवन घेइल मुक्त उभारी
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी ॥ ५ ॥
मुनिहृदयापरि ही चिरमंगल
फुलांमुलांपरि निर्मल कोमल
ही द्वैताचें दुःसह अंतर स्पर्शें सहज निवारी
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी ॥ ६ ॥
उदयें हिचिया स्तिमित दिगंतर
स्तिमित धरित्री, स्तिमितहि अंबर
मानवतेस्तव उदरिं प्रभूचा गर्भ घेउनी आली
कविता आज निराळी, अमुची कविता आज निराळी ॥ ७ ॥

—मंगेश पाडगांवकर



अनुक्रमणिका








श्री. रा. ग. कुंभोजकर

# गांधीजींचे आवडते ग्रंथ

१९२१ सालापासून तों तहत आपल्या देहान्तापर्यंत गांधीजी हिंदी राजकारणाच्या मध्यान्हीं तळपत होते. राजकारणाच्या आणि राजकारणाव्यतिरिक्तहि अनेक चळवळींच्या दिग्दर्शनाचा व्याप त्यांनीं आपल्या मागें लावून घेतलेला असल्यामुळें स्वस्थचित्तानें तासन् तास ग्रन्थवाचनांत घालविण्याइतकी फुरसद त्यांना मिळणें शक्य नव्हतें. पण वेळेच्या बाबतींत ते अतिशय काटकसरी असल्यामुळें उपरिनिर्दिष्ट कार्यांच्या घबडग्यांतूनहि वेळ काढून ते ग्रन्थवाचन करीत अथवा महादेवभाईसारख्या एकाद्या निकटवर्तियास वाचावयास सांगून आपण श्रवण करीत. या श्रवण-वाचनांत त्यांचें ग्रंथांविषयींचें प्रेम दिसून येत असलें तरी हें वाचन विशाल नव्हतें असा आक्षेप घेतला जाणें शक्य आहे.

पण नुसत्या विशाल वाचनावर—पुस्तकी पांडित्यावर—गांधीजींची श्रद्धाच नव्हती. वाचन थोडें असलें तरी चालेल पण तें आत्मसात् झालेलें असून जीवनांत उतरलेलें असावें हा त्यांचा दृष्टिकोण. वाचन काय किंवा व्यक्ति काय—ती निष्क्रिय असेल तर तिला गांधीजींच्या दरबारी मान नव्हता. टॉल्स्टॉयविषयीं ते म्हणतातः "त्यांच्या जीवनांतील कोणती गोष्ट मला अतिशय आवडली असेल तर ती म्हणजे ते ज्या तत्त्वांचा उपदेश करतात तीं तत्त्वें स्वतः आचरणांत आणतात ही होय." थॉमस अ केंपिसचें एक वचन आहेः "खरोखर, जेव्हां ईश्वरी न्यायदानाचा दिवस येतो तेव्हां आम्ही किती वाचलेलें आहे हें आम्हांस विचारण्यांत येणार नाहीं तर आम्ही त्यांतलि किती आचरणांत आणलेलें आहे हें विचारण्यांत येईल." गांधीजींचाहि हाच आग्रह होता.

गांधीजींचें वाचन विशाल नव्हतें असें एक वेळ मानलें तरी तें चौरस होतें यांत मात्र शंका नाहीं. त्यांना मनसोक्त वाचन करण्याइतकी सवड मिळायची ती कारागृहांत. गांधीजींच्या जीवनाशीं तादात्म्य पावलेले महादेवभाई यांनीं लिहिलेली दैनंदिनी अलीकडे गुजराथींत प्रसिद्ध झालेली आहे. तिच्यांतील कांहीं उतारे इंग्रजी 'हरिजन' मध्येंहि प्रसिद्ध झालेले आहेत. १२ मार्च १९३२ या दिवशीं महादेवभाईंनीं आपल्या दैनंदिनींत करून ठेवलेली नोंद गांधीजींच्या वाचनावर प्रकाश टाकणारी आहे. महादेवभाई म्हणतात—"दुपारीं कारागृहाच्या वाचनालयांतील पुस्तकांची यादी येऊन पोंचली. त्या यादींत स्कॉट, मेकॉले, ज्यूल्स व्हर्न, आणि व्हिक्टर ह्यूगो यांचे ग्रंथ आहेत कीं नाहींत याबद्दल बापूजींनीं चौकशी केली. तसेंच किंग्स्लेचें 'वेस्टवर्ड हो!' आणि गोएटेचें 'फाउस्ट' याबद्दलहि विचारणा केली. त्यांनीं मला एडवर्ड कार्पेंटरचें 'अडम्स पीक टु एलेफंटा' आणि निवेदितांचें 'क्रॅड्ल टेल्स ऑफ हिंदुइझम्' हे ग्रंथ आणण्यास सांगितले. मग ते म्हणाले—'दक्षिण आफ्रिकेंत असाच तुरुंगांत असतांना मी स्टीव्हन्सनूचें 'डॉ. जेकिल् व मि. हाइड' हें पुस्तक वाचलें होतें.'"

आधुनिक हिंदी ग्रंथकारांपैकीं मैथिलीशरण गुप्त आणि रवींद्रनाथ टागोर हे त्यांचे अधिक आवडते ग्रंथकार होते.

कोणीहि मनुष्यानें एकादा ग्रंथ तादात्म्यवृत्तीनें वाचला तर त्या ग्रंथाचा कांहीं ना कांहीं ठसा त्या वाचकाच्या मनावर उमटतो. असें असलें तरी ठसा उमटविणारा प्रत्येक ग्रंथ त्या वाचकाच्या प्रत्यक्ष जीवनक्रमाला कांहीं वळण लावील असें नाहीं.









अनुक्रमणिका

# गांधीजींचे आवडते ग्रंथ

गांधीजींचें वाचन चौरस होतें आणि त्यांनीं अनेक पाश्चिमात्य आणि पौर्वात्य ग्रंथकार वाचलेले होते. तरी या ग्रंथकारांनीं त्यांच्या जीवनावर अगदीं खोल आणि क्रांतिकारक असे संस्कार केले असें म्हणतां येणार नाहीं.

त्यांच्या जीवनावर अगदीं खोल संस्कार करणारे असे ग्रंथ थोडेच होते आणि त्यांतील अग्रेसर म्हणजे "गीता" हा होय. गीतेनें त्यांच्या मनावर आणि जीवनावर केवढे प्रभावी संस्कार केलेले होते याचें वर्णन सुप्रसिद्ध मद्रदेशीय पुढारी कोंडा व्यंकटअप्पय्या हे करतात—"गीता वाचण्यांत त्यांना फार गोडी वाटे. गीतेनें त्यांना त्यांच्या आयुष्यभर मार्गदर्शन केलें. गीतेंत ज्या तत्त्वांचें प्रतिपादन आहे त्यांवरच गांधीजींचे थोर सद्गुण आधारलेले आहेत. सत्य, अहिंसा, अपरिग्रह आणि ब्रह्मचर्य—गीतेंतील हीं सारीं थोर तत्त्वें त्यांच्या जीवनाशीं एकात्म झालेलीं होतीं; याला कारण, गीतेचा त्यांचा सतत अभ्यास, त्यांची अदमनीय इच्छाशक्ति आणि त्यांच्या श्रद्धेचा खंबीरपणा."

बायबल आणि कुराण यांनींहि त्यांच्या जीवनावर, गीतेइतके नसले, तरी बरेच संस्कार केलेले होते.

गीता, बायबल आणि कुराण या ग्रंथांना धार्मिक अधिष्ठान आहे. पण कोणत्याहि अर्थानें धार्मिक नसलेल्या अशा दोन ग्रंथांनींहि त्यांच्या मनावर दृढतर संस्कार केले होते यांत शंका नाहीं. पैकीं पहिला ग्रंथ म्हणजे रस्किन्नें लिहिलेला 'अन् टू धिस् लास्ट.' दक्षिण आफ्रिकेंत असतांना गांधीजी एकदां रेल्वेनें प्रवासास निघाले होते. तेव्हां त्यांचे स्नेही पोलकसाहेब यांनीं त्यांना प्रवासांत वाचण्यासाठीं म्हणून रस्किन्चें हें पुस्तक दिलें. रात्रभर प्रवासांत गांधीजींनीं तें वाचून काढलें. "त्या ग्रंथांतील सत्यानें त्यांच्या मनावर एवढा परिणाम केला कीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं मुक्कामाच्या ठिकाणीं पोंचल्यापासून त्यांनीं तें सत्य आचरणांत आणण्यास सुरुवात केली!"

दुसरा ग्रंथहि रस्किन्नेंच लिहिलेला आहे. या ग्रंथाचा गांधीजींच्या जीवनावर केवढा संस्कार घडला याचें वर्णन खुद्द त्यांच्याच शब्दांत देणें इष्ट होईल. गांधीजी म्हणतात—"चाळीस वर्षांपूर्वी मी जेव्हां नास्तिकवादाच्या आणि संशयाच्या घोर अवस्थेंतून जात होतों तेव्हां रस्किन्चें 'स्वर्ग तुमच्या अंतर्यामीं आहे,' या नांवाचें पुस्तक माझ्या हातीं पडलें. त्या पुस्तकाचा माझ्या मनावर खोल परिणाम झाला. त्या पुस्तकानें माझ्या नास्तिकवादाचा निरास केला आणि मला अहिंसेवर दृढ श्रद्धा ठेवण्यास शिकविलें."

---

# "बंधनें तोडून टाका"

गुरुदेव रवीन्द्रनाथांचा स्मृतिदिन नुकताच येऊन गेला. त्या निमित्तानें त्यांच्या एका उत्कृष्ट गीताचा परिचय करून घेणें अन्वर्थक ठरेल. हें गीत गुरुदेवांनीं उतार वयांत लिहिलेलें असूनहि विकासाची, नवीन निर्मितीची त्यांना केवढी तीव्र इच्छा आहे ते त्यांत दिसून येतें. प्रा. प्रभाकर माचवे यांनीं तें "अभिरुचि" मासिकाच्या जुलैच्या अंकांतील आपल्या एका लेखांत अनुवादून प्रसिद्ध केलें आहे.

बांध भेङ्गे दाओ, बांध भेङ्गे दाओ, बांध भेङ्गे दाओ, बांऽऽधा ॥
जीर्नं पुरातन,
जीर्नं पुरातन,
जाक भेसे जाक,
जाक भेसे जाक,
भाङ्गीके जयध्वनि क'र ॥

[बंधनें तोडून टाका, बंधनें तोडून टाका, बंधनें तोडून टाका! जीर्ण-पुरातन जें असेल तें सर्व नष्ट होवो, तें सर्व विरो. बंधन तोडणाऱ्या भंजकाचा जयजयकार करा!]








प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार

# महाराष्ट्रीय सन्तमंडळाचें ऐतिहासिक कार्य

## संतविषयक दृष्टिकोन

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासांतील भागवत-धर्मीय संतांचें कार्य फार महत्त्वाचें आहे. म्हणूनच आज सहासातशें वर्षांनंतरही त्यांच्या ग्रंथांची लोकप्रियता तिळमात्र कमी झालेली नाहीं. तेव्हां त्यांच्या वाङ्मयाची प्रेरणा कोणती? तत्कालीन भौतिक परिस्थितीशीं ती कितपत सुसंगत आहे? सर्वसामान्य जनतेच्या अंतःकरणावर या वारकरी पंथाचा इतका विलक्षण पगडा कसा बसला? समाजाच्या प्रगतीला संतांची विचारसरणी खरोखरीच विघातक झाली का? इत्यादि प्रश्नांची निरनिराळ्या दृष्टींनीं पुनः-पुन्हां चर्चा व्हावी हें स्वाभाविकच आहे. गेल्या साठसत्तर वर्षांत न्यायमूर्ति रानडे, टिळक, राजाराम-शास्त्री भागवत, राजवाडे, प्रो. रानडे, पोतदार, फाटक यांच्यासारख्या व्यासंगी विचारवंतांनीं हा विषय हाताळलेला आहे. न्यायमूर्ति रानडे यांनीं 'Rise of the Maratha Power' या आपल्या ग्रंथांत अत्यंत व्यापक व समतोल बुद्धीनें संतचळवळीचें समालोचन करून या प्रश्नांना तोंड फोडलें. शिवकालीन राजकीय आंदोलनाची वैचारिक पार्श्वभूमि संतमंडळाच्या कार्यांतून तयार झाली असा त्यांच्या विवेचनाचा इत्यर्थ आहे. रानड्यांच्या वृत्तींत श्रद्धा व चिकित्सा, राष्ट्राभिमान व सत्यनिष्ठा यांचा बेमालूम मिलाफ झालेला आहे. त्यामुळें कोणत्याही प्रश्नाची चर्चा करतांना त्याच्या विधायक बाजूवरच ते नेहमीं जास्त भर देतात. संतांच्या कार्यांचें वैशिष्ट्य त्यांनीं सांगितलें; परंतु त्यांच्या कर्तृत्वांतील उणीवा दाखविल्या नाहींत. भागवत-धर्म व महाराष्ट्रधर्म यांचा समन्वय त्यांनीं साधला; पण त्यांतील विरोधाची मीमांसा मात्र केली नाहीं. राजवाडे-भावेप्रभृति राष्ट्रवादी लेखकांना हा उदार दृष्टिकोन मानवला नाहीं. संताळ्यांचा भक्तिपंथ त्यांना निष्क्रियतेचा व नेभळटपणाचा वाटला. पुनरुज्जीवनशील राष्ट्रवाद हा त्या काळच्या मध्यमवर्गीय सुशिक्षितांचा युगधर्म होता. युरोपचा इतिहास वाचून राष्ट्रवादाची महती त्यांना पटली होती. पण हा नवा विचार-प्रवाह भारतीय इतिहासाच्या अनुपानांत घोळल्या-शिवाय ग्रहण करणें त्यांना इष्ट वाटलें नाहीं. त्यामुळें एकोणिसाव्या शतकांतील आधुनिक कल्पना जुन्या ऐतिहासिक व्यक्तींवर कळत नकळत लादल्या गेल्या. शिवाजी स्वातंत्र्यवादाचा प्रणेता ठरला. रामदास राष्ट्रवादाचे प्रवक्ते बनले. ' तुका म्हणे तोची संत। सोशी जगाचे आघात॥ ' ' तुका म्हणे कढे करावीं शीतळ। ऐसें जातिबळ चंदनाचें॥ ' अशा सहिष्णुतेच्या व सहानुभूतीच्या शिकवणीपेक्षां ' सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें ', ' मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा '; ' आधीं गाजवावे तडाके। मग भूमंडळ धाके ', ' देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परते ' यासारखी प्रतिकाराची व पराक्रमाची शिकवणच सर्वांना अधिक स्फूर्तिदायक वाटली. रामदासांच्या महाराष्ट्रधर्माच्या अनुरोधानें नव्या राष्ट्रवादाची उभारणी झाली; आणि भागवत-धर्मावर दुबळेपणाचा व समाजपराङ्मुखतेचा कायमचा छाप बसला. याशिवाय प्रा. रा. द. रानडे यांनीं स्वतंत्रपणें संतवाङ्मयाचें परिशीलन केलें आहे. त्यांचा दृष्टिकोन साक्षात्कारवादी आहे. ह. भ. प.









अनुक्रमणिका

पांगारकर यांनींही या संतसाहित्याचा भक्तिभावानें व रसिकतेनें सविस्तर परामर्श घेतला आहे. या सर्व विचारसरणींत न्यायमूर्ति रानड्यांची विचारसरणीच ऐतिहासिक दृष्ट्या अधिक निर्दोष आहे. परंतु तिला हवी ती मान्यता कधींच मिळाली नाहीं. उलट सुशिक्षित मध्यमवर्गीयांनीं राजवाड्यांची एकांगी विचारसरणीच बिनादिक्कत प्रमाण मानली आणि बहुसंख्य अशिक्षित लोक पांगारकरांच्या परंपरागत दृष्टिकोनाला चिकटून राहिले. खरें पाहिलें तर केवळ सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें इतिहासाचें अध्ययन व्हावयास हवें. कोणत्याही विचारसरणीच्या तात्कालिक प्रचारासाठीं इतिहास राबविणें हें अशास्त्रीयतेचें व अदूरदर्शीपणाचें द्योतक आहे. ऐतिहासिक घटनांचें वस्तुनिष्ठ आकलन ( objective knowledge ) हें केव्हांही हितावहच होणार या भावनेनें इतिहासाचें संशोधन व समीक्षण झालें पाहिजे. आपणांस इतिहासाचें पुनर्मूल्यमापन करावयाचें आहे; पुनर्रचना करावयाची नाहीं ही गोष्ट इतिहासकारानें कधीं विसरतां कामा नये.

## ग्रंथ-परिचय

या दृष्टीनें श्री. बा. रं. सुंठणकर यांचा 'महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य' हा ग्रंथ[1] मला विशेष स्वागतार्ह वाटतो. त्यांनीं स्वतःच निवेदनांत म्हटल्याप्रमाणें "नव्या महाराष्ट्राची उभारणी, मराठी भाषेचा उत्कर्ष, आणि संतचळवळ यांचा निकटचा संबंध दिसून येतो. ही ऐतिहासिक दृष्टि ठेवून संतकार्याचें पुनर्मापन होणें अवश्य आहे, या जाणिवेंतून या पुस्तकाचा जन्म झाला आहे." ग्रंथाच्या पूर्वार्धांत संत-चळवळीचें धावतें समालोचन करून उत्तरार्धांत मार्क्सप्रणीत वस्तुवादी दृष्टीनें तिचें मूल्यमापन केलें आहे. श्री. सुंठणकरांची भूमिका ही प्रायः पूर्वग्रहरहित व पक्षनिरपेक्ष असल्यामुळें त्यांचें विवेचन बरेंच मूलगामी व विचारप्रवर्तक झालें आहे. आतांपर्यंत संतवाङ्मयावर मराठी भाषेंत अनेक ग्रंथ लिहिले गेले आहेत. त्यांत अगदीं नव्या दृष्टिकोनांतून लिहिलेल्या या पुस्तकानें फार मोलाची भर घातली आहे यांत बिलकूल शंका नाहीं. या ग्रंथाला आचार्य भागवत यांनीं एक विस्तृत व उद्बोधक प्रस्तावना लिहिली आहे. तींत त्यांनीं रूढ कल्पनांना धक्के देणारे कांहीं नवे सिद्धांत मांडले आहेत. त्याबद्दल बराच मतभेद होण्याचा संभव आहे. परंतु या लहानशा लेखांत त्या वादग्रस्त प्रश्नांचा यथोचित परामर्श घेतां येणार नाहीं.

सर्वसंगपरित्याग करून संसार सोडण्याचा पळपुटा मार्ग संतांनीं सांगितला नाहीं; तर कष्टमय जीवनांत धीर धरण्याचा, सांसारिक आपत्तींशीं निर्भयतेनें झगडण्याचा त्यांनीं उपदेश केला. मात्र प्राप्त परिस्थितीविरुद्ध बंड करण्याची त्यांची तयारी नव्हती. श्री. सुंठणकरांच्या एकंदर प्रतिपादनांतील हा मथितार्थ बहुधा कुणालाच अमान्य होणार नाहीं. परंतु हा मुख्य विचार मांडतांना प्रत्येक प्रकरणांत त्यांनीं दिलेली ऐतिहासिक माहिती, उद्धृत केलेलीं मूळ ग्रंथांतील वचनें, व त्यांतून काढलेलीं अनेकविध अनुमानें हीं मात्र तेवढीं वादातीत नाहींत. कांहीं ठिकाणीं परस्परविरोधीं विधानें आढळतात. पृष्ठ ३३ वर "भक्तिमार्ग ही एक मानवी जीवनांतील अशीच पळवाट आहे" असें निःसंदिग्धपणें म्हणून पुन्हां पृष्ठ ११३ वर त्याच्या अगदीं उलट अभिप्राय व्यक्त केला आहे. म्हणून या ग्रंथांतील सर्वच तपशील कसोशीनें पारखून घ्यावा लागेल. मात्र मी या लेखांत त्याचें साद्यंत परीक्षण करणार नाहीं. कारण हा विषय अतिशय व्यापक व गुंतागुंतीचा आहे. त्याबाबत निर्णायक मतें बनविण्यास आवश्यक असलेलीं साधनें फारच थोडीं उपलब्ध आहेत; आणि तींही तितकीं विश्वसनीय नाहींत. अशा स्थितींत या विषयाचा ऊहापोह करतांना पदोपदीं मतभेद झाले तर नवल नाहीं. तेव्हां केवळ विस्तारभयास्तव

[1] महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य—लेखक : प्रा. बा. रं. सुंठणकर, बी. एजी. प्रकाशक—ए. पी. चौगुले, अजित एजन्सी, बेळगांव.






प्रस्तुत ग्रंथांतील सर्व प्रश्नांना स्पर्श न करतां दोन-चारच महत्त्वाचे मुद्दे घेऊन त्यांची मी सविस्तर चर्चा करणार आहे.

## वस्तुवादी इतिहासमीमांसा

कार्ल मार्क्सनें सामाजिक इतिहासाकडे पाहण्याचा जो एक विशिष्ट दृष्टिकोन बसविला आहे त्याला 'वस्तुवादी इतिहासमीमांसा' या नांवानें संबोधणेंच योग्य होईल. पण या ठिकाणीं 'वस्तु' हा शब्द केवळ जडसृष्टीपुरताच मर्यादित नाहीं. भौतिक परिस्थितीशीं सुसंगत असल्यामुळें जनमनाची पकड घेणाऱ्या विचारप्रवाहांचाही त्यांत अंतर्भाव होतो.[२] हा दृष्टिकोण म्हणजे कुठल्याही देशांतील कोणत्याही ऐतिहासिक घटनांचा हुकमी अन्वयार्थ लावण्याचा सांप्रदायिक गुरुमंत्र नव्हे. इतिहासाच्या शास्त्रशुद्ध अध्ययनाची ती सर्वसामान्य दिशा आहे.[३] समाजजीवन हा निरनिराळ्या शक्तींच्या व प्रेरणांच्या संघर्षांतून सिद्ध होणारा जिवंत प्रवाह आहे. त्याला एखाद्या ठराविक सांच्यांत चपखल बसवितां येईल ही कल्पनाच मुळीं भ्रामक आहे. सामाजिक जीवनांतील कोणत्याही कालखंडाचें, किंवा राजकारण, धर्म, तत्त्वज्ञान, साहित्य, कला इत्यादि अंगोपांगांचें परिशीलन करतांना त्या त्या क्षेत्रांतील साधनसामग्रीची स्वतंत्रपणें व साकल्यानें पाहणी करणें आवश्यक आहे. वस्तुवादी विचारसरणीप्रमाणें आर्थिक हितसंबंध हीच सामाजिक परिवर्तनाची मूलभूत व प्रबलतम प्रेरणा आहे यांत अणुमात्र संशय नाहीं. परंतु याचा अर्थ समाजजीवनाचीं इतर अंगें परभृत व प्रेरणाशून्य आहेत, त्यांचा परस्परांवर कांहींच परिणाम होत नाहीं असा नव्हे.[४] समाजजीवन हें एकात्म असलें तरी एकरूप नाहीं. त्याच्या शाखोपशाखांत एकसूत्रीपणा असला, तरी त्यामुळें प्रत्येक शाखेची स्वायत्तता व वैशिष्ट्य नाहींसें होत नाहीं. मार्क्स-एंगल्सनां कल्पनावाद्यांशीं सामना द्यावयाचा असल्यामुळें भौतिक बाजूवरच त्यांनीं जास्त भर दिला. परंतु सांस्कृतिक प्रवाहांचा कार्यभाग त्यांना अमान्य नव्हता. सामाजिक जीवनाच्या सर्वच विभागांत प्रचलित अर्थव्यवस्थेचे परिणाम घडून आल्याखेरीज रहात नाहींत. परंतु प्रत्येक विभागाची प्रतिक्रिया आपआपल्या स्वभावधर्मानुरूप वेगवेगळें रूप धारण करते. आर्थिक परिस्थिति ही कितीही बलवत्तर असली, तरी कोणत्याही विभागाचें पूर्व-

---

२ "Theory itself becomes a material force when it takes hold of the masses."

—Marx : *On Hegel's Philosophy of Law* (1844)

३ "Our conception of history is, above all, a guide to study, not a lever for construction after the manner of the Hegelians. All history must be studied afresh, the conditions of existence of the different formations of society must be individually examined before the attempt is made to deduce from them the political, civil-legal, æsthetic, philosophic, religious, etc. notions corresponding to them."

Karl Marx : *Selected Works*, Vol. I, p. 320

४ "Hanging together with this is the fatuous notion of the ideologists that because we deny an independent historical development to the various ideological spheres which play a part in history we also deny them any effect upon history. The basis of this is the common undialectical conception of cause and effect as rigidly opposite poles, the total disregarding of interaction."

—*Ibid*, p. 329








संचित तिला अजिबात डावलतां येत नाहीं.[५] म्हणून भौतिक व सांस्कृतिक जीवनाचा परस्पर-संबंध नेहमींच सुस्पष्ट व सरळ असतो असें नाहीं. तसें असतें तर सामाजिक जीवनाचें रहस्य उलगडणें हें गणितांतील एखादें साधें समीकरण सोडविण्या-इतकेंच सोपें होऊन बसलें असतें. तेव्हां कोणत्याही इतिहासाला ही दृष्टि लावतांना तिचा विपर्यास होणार नाहीं याची काळजी घेतली पाहिजे. युरोपच्या इतिहासांतून निघालेले निष्कर्ष महाराष्ट्राच्या इतिहासाला तंतोतंत कसे लागू पडणार ? पाश्चात्य तत्त्वज्ञानांतील अंतर्विरोध भारतीय तत्त्वज्ञानांत जसाच्या तसा कोठून आढळणार ? युरोपांतील धर्मकारण व महाराष्ट्रांतील धर्मकारण यांत खूपच तफावत आहे; त्यांची गल्लत करण्यापासून कांहींच निष्पन्न होणार नाहीं. ज्या ठिकाणीं पुरेशीं साधनें उपलब्ध नाहींत त्या ठिकाणीं सर्व इतिहासाची एकदम संगति लावतां येणें शक्य नाहीं. अशा वेळीं इतिहासकारानें ओढून ताणून कार्यकारणभावाची सांखळी जुळवीत न बसतां न सांधले गेलेले दुवे वाचकांपुढें प्रांजलपणें मांडण्यांतच वस्तुनिष्ठ दृष्टीची खरी कसोटी आहे. सांस्कृतिक जीवनांतील लहानसहान घडामोडींचीं कारणें त्या त्या काळच्या आर्थिक परिस्थितींत हमखास सांपडलींच पाहिजेत हा आग्रह फुकट आहे. कारण, अत्यंत व्यापक क्षेत्रांतच फार मोठ्या कालखंडाचा विचार करीत असतांना आपणांस हा सांस्कृतिक व आर्थिक विभागांचा कार्यकारणभाव निरपवादपणें दाखवितां येतो[६]. म्हणूनच कार्ल मार्क्सनें आपल्या इतिहासमीमांसेंत युरोपच्या सबंध इतिहासाचे अवघे चारच कालखंड पाडले आहेत.

ऐतिहासिक संस्थांचें मूल्यमापन करतांना भावनावशतेनें त्यांचा गौरव किंवा अधिक्षेप करण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. तर त्यांचें प्रवाही स्वरूप ध्यानांत घेऊन त्यांच्या निरनिराळ्या अवस्थांचे समाजावर काय परिणाम झाले ते स्पष्ट करणें हेंच इतिहासकाराचें आद्य कर्तव्य आहे. युरोपांतील मठसंस्था ही मध्ययुगाचे अखेरीस कितीही जाचक व प्रतिगामी बनली असली तरी तिनें आरंभींच्या काळांत शिक्षणप्रसाराचें, संस्कृतिसंवर्धनाचें व शेतकीसुधारणेचें फार मोठें कार्य केलें आहे. तिकडे डोळेझांक करून त्या संस्थेवर सरसकट ताशेरे ओढणें अन्यायाचें होईल. गुलामगिरीसारख्या संस्थेची चर्चा करतांनाही एंगल्सनें जुन्या रानटी काळाच्या मानानें तिचा उदय हा प्रगतिकारकच होय असें आपलें स्पष्ट मत प्रगट केलें आहे. ज्या संस्था आज आपणांस तापदायक व हानिकारक वाटतात त्या पूर्वीही तशाच असतील

---

५ "I consider the ultimate supremacy of economic development established in these spheres too, but it comes to pass within conditions imposed by the particular sphere itself.... ... Here economy creates nothing '*a novo*' (absolutely new), but it determines the way in which the existing material of thought is altered and further developed and that too for the most part indirectly, for it is the political, legal and moral reflexes which exercise the greatest direct influence upon philosophy."

—*Ibid.* p. 326-7

६ "The further the particular sphere, which we are investigating, is removed from the economic sphere and approaches that of pure abstract ideology, the more shall we find it exhibiting accidents in its development, the more will its curve run in a zig-zag. But if you plot the average axis of the curve, you will find that the axis of this curve will run more and more nearly parallel to the axis of the curve of economic development, the longer the period considered and the wider the field dealt with."

—*Ibid.* 331-32



अनुक्रमणिका






असें मानून चालणार नाहीं. त्या त्या काळची परिस्थिति पाहून आपणांस याचा निर्णय करावा लागेल. ब्राह्मणशाहीची चिकित्सा करतांनाही हीच गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे. ज्या वेळीं समाजाची उत्पादनशक्ति अगदीं बेताची असते, त्या वेळीं सांस्कृतिक मूल्यांच्या जोपासनेसाठीं एक स्वतंत्र वर्ग निर्माण होणें स्वाभाविक आहे. पण उत्तरोत्तर आपल्या सामाजिक प्रतिष्ठेचा दुरुपयोग करून तोच वर्ग अधिकाधिक सवलती घेऊं लागतो; आणि अखेरीस सर्व समाजाच्या प्रगतीलाच पायबंद घालण्यास कारणीभूत होतो. तेव्हां ज्या काळाचा आपण विचार करतों, त्या काळांत या वर्गाची खरोखर समाजाला गरज होती का ? असल्यास ती गरज भागविण्याचें काम या वर्गानें कितपत केलें ? दुसऱ्या सत्ताधारी वर्गांशीं याचे संबंध कशा स्वरूपाचे होते ? इत्यादि प्रश्नांची अगोदर आपण परिश्रमपूर्वक दखल घेतली पाहिजे. तसें न करतां सगळ्या समाजाच्या अधःपाताचें खापर एकट्या ब्राह्मणशाहीच्या माथीं फोडल्यास आपणांस जुना इतिहास तर कळणार नाहींच, पण नवे प्रश्न सोडविण्यालाही मदत होणार नाहीं.

## संतकालीन महाराष्ट्र

संतचळवळीचें रहस्य समजून घ्यावयाचें तर प्रथम तत्कालीन भौतिक परिस्थितीची पार्श्वभूमि नीट बाघितली पाहिजे. तेराव्या शतकाच्या अखेरीस संतचळवळ सुरू झाली. त्यावेळीं महाराष्ट्रांत यादवकुळांतील रामदेवरावाची राजवट चालू होती. यादवसत्तेच्या भरभराटीचा काळ संपून तिला ओहोटी लागल्याचीं चिन्हें या अमदानींतच दिसूं लागलीं होतीं. "रामदेवराव हा लढवय्या पुरुष नव्हता. सातारच्या शाहू राजासारखा सुखोपभोगी, सैल, व मृदु माणूस होता. हरिदासांच्या कथा, शास्त्र्यांच्या संभावना, मानभावांचे संवाद, हेमाद्रीचीं व्रतें-उद्यापनें इ. पारमार्थिक बाबतींत त्याचा सर्व वेळ खर्चिला जाऊन सैन्य व राज्य ह्यांच्या तयारीकडे त्याचें बिलकुल लक्ष नव्हतें. राजपुरुषाला सर्वथा अयोग्य अशा ह्या वर्तनाचे दुष्परिणाम बरेच होऊन चुकले होते. परंतु ते उत्कटत्वानें दृश्यमान होण्यास शके १२१६ तील अल्लाउद्दिनाची स्वारी विशेष कारण झाली. अल्लाउद्दिनाची धाड येण्यापूर्वी कर्नाटक, कोंकण इत्यादि बहुतेक सर्व प्रांतांतून मांडलिक राजे बेलगाम होऊन सम्राट्-सत्ता नांवाला मात्र राहिली होती[७]." महानुभावांच्या लीळाचरित्रांतही "महादेओ राजा राज्यधर्म जाणे। कान्हर देवो आस्तिकः रामदेवो निपरवस[८]" असा उल्लेख आढळतो. दिल्लीच्या सुलतानाशीं वागतांना रामदेवानें पुढें जी लाचारी व परधार्जिणेपणा दाखविला त्यामुळें या मताला दुजोराच मिळतो. मात्र पहिल्या स्वारींत अल्लाउद्दिनानें नेलेल्या लुटीचा तपशील वाचला, म्हणजे या राजघराण्याच्या अलोट ऐश्वर्याची साक्ष पटते. यादवांच्या मांडलिकांनीं व अधिकाऱ्यांनीं दिलेलीं जीं दानपत्रें आढळतात, त्यांवरून त्यांच्या संपन्नतेबद्दलही शंका उरत नाहीं. परंतु पांचपंचवीस शहरांतील या मूठभर सत्ताधारी वर्गाच्या सुस्थितीवरून सर्वसाधारण जनतेच्या जीवनक्रमाची कांहींच कल्पना येत नाहीं. मात्र या अल्पसंख्य अनुत्पादक वर्गाच्या हातांत जी एवढी विपुल संपत्ति सांचून राहिली होती, तिचा बराचसा भाग (कांहीं भाग परप्रांतीय स्वाऱ्यांतून मिळविलेला असला तरी) शेतकऱ्यांच्या उत्पन्नांतून जमा झालेला असला पाहिजे हें उघड आहे. तेव्हां त्या काळीं सामान्य शेतकऱ्याची आर्थिक परिस्थिति कशी होती, त्याच्या राहणीचें मान काय होतें, इतर वर्गांशीं त्याचे कशा प्रकारचे संबंध होते, इत्यादि गोष्टींचा उलगडा झाल्याखेरीज आपणांस सांस्कृतिक चळवळींची भौतिक मीमांसा करतां येणार नाहीं. परंतु आज या काळांतील वाङ्मयच फक्त आपल्यासमोर आहे. इतर अस्सल व प्रमाणभूत साधनांची अतिशय उणीव आहे. त्यामुळें भौतिक परिस्थितीच्या प्रकाशांत वाङ्मयाचें परिशीलन करण्या-

७. वि. का. राजवाडे—'महिकावतीची बखर', प्रस्तावना पृ. ४२.

८. लीळाचरित्र—भाग २ रा., पृ. ४६ [कान्हरदेवो=कृष्णदेव; निपरवस=बेछूट]





अनुक्रमणिका

ऐवजीं वाङ्‌मयाच्या अनुरोधानें भौतिक परिस्थितींचें चित्र रेखाटण्याची पाळी आली आहे. शिवाय आपलें बहुतेक सर्व साहित्य परमार्थपर आहे. त्यांत उपमादृष्टांतांच्या द्वारेंच लौकिक बाबींचा काय तो प्रवेश व्हावयाचा. अशा स्थितींत वाङ्‌मयावरून जे निष्कर्ष काढावयाचे, ते फारच जबाबदारीनें काढले पाहिजेत.

या दृष्टीनें श्री. सुंठणकरांचीं कांहीं अनुमानें अगदींच मनःकल्पित वाटतात. शेतकऱ्यांच्या दुःस्थितीचें वर्णन करतांना त्यांनीं ज्ञानेश्वरींतील पांचसात वचनें उद्‌धृत केलीं आहेत. त्यांतील दोनच वचनें विचारांत घेऊं.

(१) न म्हणे अवसीं पाहाटीं (अ० १३–२९)

— शेतकरी रात्रंदिवस शेतांत खपतो; तरीहि त्याचा प्रपंच नीट चालत नाहीं. मूळ अवतरणाचा अर्थ शेतकऱ्यास अहोरात्र राबावें लागतें इतकाच आहे. तरी देखील त्याची स्थिति हलाखीची असते हें लेखकाच्या पदरचें आहे. ग्रंथांतील वचनांतून तसें अनुमान निघत नाहीं. उलट याच वर्णनांत पुढें शेतांत मुबलक पीक येतें असेंही म्हटलें आहे. तेवढ्यावरून शेतकऱ्याच्या जीवनांत सुबत्ता होती असें मानतां येईल का ?

(२) तरी देवाची खाये। विकूनिया
(अ० १८–५६९)

दारिद्र्यामुळें शेतकऱ्यावर केव्हां केव्हां देवच विकून खाण्याची पाळी येत असे असा या ओंवींतून श्री. सुंठणकरांनीं निष्कर्ष काढला आहे. वास्तविक हें वर्णन तामसवृत्तीच्या माणसाचें आहे. 'ईश्वर फलदाता आहे म्हणून त्याची भीति बाळगण्याऐवजीं, तो तामस वृत्तीचा मनुष्य त्या देवालाच विकून खातो' असा मूळ ओंवीचा उघड अर्थ आहे; त्यांत शेतकऱ्याचा कांहीं संबंध नाहीं, व परिस्थितीमुळें देव विकावे लागण्याचाही प्रश्न नाहीं.

तामसवृत्तीचा मनुष्य किती अविवेकी व बेजबाबदार असतो तें या ओंवींत ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे.

संतांच्या गृहजीवनाविषयीं लिहितांनाही अशींच ऐसपैस अनुमानें काढलीं आहेत. संतांचे कांहीं अभंग तरी निःसंशय रूपकात्मक आहेत. त्यांचा सरळ वाच्यार्थ घेऊन चालणार नाहीं. ज्ञानेश्वरांचें घोंगडें फाटलें होतें; उघड्या पाठीवर हींव वाजत वाजत असतांही नवीन घोंगडें घेण्यास त्यांच्याजवळ पैसा नव्हता; म्हणून त्यांना असहायतेनें विठोबाची करुणा भाकावी लागली; यावरून ज्ञानेश्वरांच्या दरिद्री जीवनाची कल्पना येते, असें श्री. सुंठणकर म्हणतात. ज्ञानदेवांच्या गाथ्यांत 'घोंगडी' म्हणून एक छोटेसें रूपकात्मक प्रकरण आहे. त्यांतील ओळीच खालीं उद्‌धृत करतों म्हणजे वरील विधानाचा फोलपणा आपोआप सिद्ध होईल.

खिरजट घोंगडें फाटकें तें कैसें।
वेंचिलें तैसें भोगिजे गा॥
वित्त नाहीं गांठीं जीवित्वा आटी।
उघडी पाठी हींव वाजे॥
घोंगडें देईल तो एक दाता।
रखुमादेविवरा मागों रे आतां[९]॥

येथें 'हींव' शब्दांतील आशय लौकिक नाहीं, आध्यात्मिक आहे; आणि त्यांतूनही ज्ञानेश्वरांवर खरोखरचि अशी आपत्ति आली असती, तरी—

दैन्यदुःखीं न तपे। भयशोकीं न कंपे।
देहमृत्यु न वासिपे। पातलेनी॥
आर्तिआशापडिभरें। वयव्याधीगजरें।
उजू असतां पाठिमोरें। नव्हे चित्त[१०]॥

अशा वृत्तीचा हा स्थितप्रज्ञ योगिराज त्यासाठीं देवापाशीं गाऱ्हाणें गात बसला असतां, असें वाटत नाहीं. "हातांत नरोटी जीर्णाचे ते भार; परळ भोपळ्याची गृहामाजी संपत्ति" हा आत्मतृप्तांचा आध्यात्मिक अहंकार आहे; दुःखपीडितांचा दीनवाणा सुस्कारा नाहीं.

यादवकालीन आर्थिक परिस्थितीविषयीं निश्चित माहिती मिळत नाहीं. म्हणून युरोपच्या मध्ययुगीन इतिहासाची चौकट घेऊन तिच्यांत महाराष्ट्रांतील घडामोडी कोंबण्याचा प्रयत्न करणें रास्त नाहीं. युरोप

९ ज्ञानेश्वर-गाथा (साखरे-प्रत) पृ. ५९३
१० ज्ञानेश्वरी–१३–४९२-९३–[न वासिपे=भीत नाहीं; पडिभर=अतिशय]





अनुक्रमणिका

प्रमाणेंच महाराष्ट्रांतही सरंजामशाही होती. परंतु तिचें स्वरूप अगदींच भिन्न होतें. त्या काळीं जमीन हीच उत्पन्नाची मुख्य बाब होती. निरनिराळ्या वर्गांचे आर्थिक हितसंबंध जमिनीशीं निगडित झालेले होते. राजसंस्था, वतनसंस्था व ग्रामसंस्था यांचें लक्ष्यकेंद्र जमीन हेंच होतें. एवढ्या अर्थानेंच येथील पद्धतीला सरंजामदारी पद्धति म्हणतां येईल. युरोपप्रमाणें येथेंही वतनदार वर्ग होता. परंतु इथला शेतकरी भूदास नव्हता. युरोपांत प्रत्येक खेड्यांतील जमीन प्रायः कुणातरी सरंजामदाराच्या मालकीची असे त्याच्याकडून शेतकऱ्यास ती कसण्यासाठीं मिळे; व तिच्या मोबदल्यांत त्याला सरंजामदाराच्या शेतावर आठवड्यांतून दोन किंवा तीन दिवस खपावें लागे. शिवाय इतर अनेक बाबतींत त्याच्यावर सरंजामदाराची हुकमत होती. हा संबंध उघड उघड सक्तीवर आधारलेला होता. त्यांतील पराधीनता व पिळणूक इतकी स्पष्ट व ढळढळीत होती कीं, ज्या ज्या वेळीं शेतकऱ्यांना हीं बंधनें दुःसह होत, त्या त्या वेळीं ते सरंजामदारांविरुद्ध सहजच बंड करण्यास प्रवृत्त होत.

महाराष्ट्रांतील शेतकरी हा बहुधा स्वतःच जमिनीचा मालक होता.[११] त्याचा मुख्य झगडा निसर्गाविरुद्ध होता. जमिनीची अल्प उत्पादनशक्ति हें त्याकाळीं सामाजिक दुरवस्थेचें प्रबळ कारण होतें. शिवाय पावसाच्या अभावीं वारंवार पडणाऱ्या दुष्काळांनीं या दुःस्थितींत आणखी भर पडत असे. युरोपप्रमाणें येथें शेतकऱ्यांची पिळणूक होत नव्हती असें मुळींच नाहीं. परंतु ती अप्रत्यक्ष व व्यक्तिनिरपेक्ष होती. येथील शेतकरी हा जरी परंपरेचा व रूढीचा दास असला, तरी कुणाही व्यक्तीचा ताबेदार नव्हता. राजसंस्था, वतनसंस्था, ग्रामसंस्था, जातिसंस्था, धर्मसंस्था इत्यादि संस्थांच्या द्वारां त्यांच्या उत्पन्नांतील बराचसा भाग संभावितपणें हिरावून घेतला जाई. या सर्व संस्थांना दैवी अधिष्ठान लाभलें होतें. त्यामुळें त्यांच्या गुलामगिरीलाहि धर्मनिष्ठेचें सोज्वळ स्वरूप प्राप्त झालें. राजा हा विष्णूचा अंश बनला. स्वामिभक्ति ही स्वर्गाची प्रवेशपत्रिका गणली गेली. ग्रामधर्म, व जातिधर्म यांचें पावित्र्य स्वतःसिद्ध व अबाधित राहिलें. आपल्या धर्मजीवनांत अनेक देवता गुण्यागोविंदानें एकत्र नांदत होत्या, त्याप्रमाणेंच आपलें भौतिक जीवनही बहुसत्ताक होतें. राजसत्ता तत्त्वतः सार्वभौम व अनियंत्रित असली, तरी जमिनीचा सारा वसूल करण्यापुरताच शेतकऱ्यांशीं तिचा प्रत्यक्ष संबंध पोहोंचत असे. एरव्हीं सर्वच बाबतींत खेडेगांवांतील जीवन स्वतंत्र व स्वयंपूर्ण होतें. मोठमोठीं राजकीय स्थित्यंतरें झालीं, तरी ग्रामसंस्थेच्या स्वरूपांत कधीं फारसा फरक पडला नाहीं.

खेडेगांवांतील दैनंदिन जीवनाबद्दल उदासीन असणारी राजसत्ता, आपआपल्या प्रांतांत स्वतंत्र व समर्थ असूनही परंपरागत रूढीपुढें मान तुकविणारा सरंजामदार, गांवचा राजा असूनही ग्रामसंस्थेशीं एकनिष्ठ राहणारा पाटील, आणि ग्रामसंस्थेचा घटक असूनही प्रसंगीं शेतकऱ्याची पिळणूक करणारा बलुतेदार यांमध्यें मध्ययुगीन महाराष्ट्रांतील भौतिक सत्ता विभागलेली होती. या संस्थांना दैवी अधिष्ठान मिळवून देण्याचें कार्य मात्र ब्राह्मणशाहीनें केलें. परंतु युरोपांतील पोपशाहींत व या ब्राह्मणशाहींत खूपच अंतर आहे. रोमन कॅथॉलिक चर्च ही धर्मसंस्था सुसंघटित होती. राजसत्तेवरही तिचें प्रत्यक्ष नियंत्रण होतें. ख्रिस्ती जगतांतील जवळ जवळ एक तृतीयांश जमिनी चर्चच्या मालकीच्या होत्या. युरोपीय धर्मसंस्थेंत लौकिक व आध्यात्मिक सत्ता अशा रीतीनें एकवटलेली होती. उलट ब्राह्मणशाहीच्या भरभराटीचा काळ येऊन गेल्यानंतरही पुणें जिल्ह्यांत चार-पंचमांश जमिनी शेतकऱ्यांच्या मालकीच्या होत्या.[१२] तेव्हां तेराव्या शतकांत सबंध महाराष्ट्रांतील बऱ्याचशा जमिनी ब्राह्मणांनीं गिळंकृत केल्या होत्या या म्हणण्यांत कांहीं हंशील नाहीं. देवस्थानांना व ब्राह्मणांना गांवें

---

११ A. S. Altekar—A History of Village Communities in Western India, p. 86.

१२ Bomay Gazetteer, Vol. XVIII, P. II








व जमिनी दान दिल्या जात. परंतु त्याचा अर्थ इतकाच कीं, राजा किंवा मांडलिक आपला भाग त्यांच्या स्वाधीन करी. जमिनीच्या मालकीचा यांत बिलकुल संबंध नव्हता.[१३] ज्या वेळीं केवळ उत्पन्न न देतां प्रत्यक्ष जमिनीच दान देण्यांत येत, त्यावेळीं राजा मालकापासून त्या अगोदर विकत घेई. तेव्हां महाराष्ट्रांत तरी पेशवाईपूर्वी ब्राह्मणांच्या हातांत भौतिक सत्ता नव्हती हें खास. कांहीं ब्राह्मण व्यक्तिशः अधिकारपदावर असतील; आर्थिक दृष्ट्या संपन्नही असतील. परंतु एकंदर ब्राह्मणवर्गापाशीं जनतेची पिळणूक करण्याइतपत आर्थिक शक्ति होती असें मानावयास कांहीं पुरावा नाहीं. लोकांचा धर्मभोळेपणा व बौद्धिक गुलामगिरी हाच येथील ब्राह्मणशाहीचा खरा आधार होता. जोशी हा ग्रामसंस्थेचा घटक होता. कुलकर्णी, देशपांडे, पंडित व पुरोहित हे राजसंस्थेवर अवलंबून होते. मात्र हा वर्ग शासनसंस्थेच्या उत्पन्नांतील भागीदार असल्यामुळें त्यानें लोकांच्या मनावर जुन्या शास्त्रग्रंथांची पकड कायम ठेवण्याची पराकाष्ठा केली. शास्त्रप्रणीत कर्मवाद व जन्मसिद्ध जातिव्यवस्था यांमुळें व्यक्तित्वाच्या विकासाला वाव उरला नाहीं; आणि समाजांतील कनिष्ठ वर्गांवर आर्थिक गुलामगिरीहूनही भयंकर अशी मानसिक गुलामगिरी लादली गेली. अशा रीतीनें ब्राह्मणशाहीनें शासनसंस्थेचे हात बळकट केले; व शासनसंस्थेनें या वर्गाच्या योगक्षेमाची काळजी वाहून त्यांच्या सामाजिक प्रतिष्ठेला कधीं धक्का लागूं दिला नाहीं. "परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ" ही धर्माज्ञा दोन्ही वर्गांनीं थोड्या निराळ्या अर्थानें पण अक्षरशः पाळली.

## संत-चळवळींतील सामाजिक संघर्ष

भौतिक दुरवस्था व मानसिक गुलामगिरी यांमुळें सामान्य जनता जडमूढ व अगतिक बनलेली होती. या केविलवाण्या स्थितींतून तिला मुक्त करण्यासाठीं संतचळवळ जन्मास आली. या चळवळीचें कार्यक्षेत्र बऱ्याच अंशीं धार्मिक व सांस्कृतिक होतें. सामाजिक जीवनांतील मूलभूत प्रश्नांना तिनें हात घातला नाहीं. युरोपप्रमाणें आर्थिक झगड्याची तिला साथही मिळाली नाहीं. शास्त्रप्रामाण्याला व जातिव्यवस्थेला धक्का न लावतां वारकरी पंथानें स्त्री-शूद्रादिकांना आत्मविकासाचा मार्ग खुला करून दिला. पूर्वकर्मानुसार प्राप्त झालेल्या बाह्य परिस्थितींत आपणांस यत्किंचितही बदल करतां आला नाहीं, तरी हताश होण्याचें कारण नाहीं. कोणत्याही जातीच्या मनुष्याला भक्तिपंथाच्या द्वारां आध्यात्मिक उन्नति साधतां येईल, नैतिक सामर्थ्य वाढवितां येईल, प्रापंचिक दुःखावर मात करतां येईल, असा अगदीं खालच्या थरांतील लोकांतही या चळवळीनें विश्वास निर्माण केला.[१४] त्यामुळें या संत-संप्रदायांत ब्राह्मण, कुणबी, माळी, तेली, सुतार, सोनार, कुंभार, महार इत्यादि भिन्न भिन्न जातींतील लोक सामील झाले.

वारकरी पंथांतील बरेचसे भक्त ग्रामसंस्थेंतील अलुते-बलुतेदार होते. मात्र या पंथाला तात्त्विक अधिष्ठान मिळवून देण्याचें कार्य ज्ञानेश्वर-एकनाथांच्या ग्रंथांनीं केलेलें आहे. त्यांनीं वैदिक परंपरेचा बीज राखूनच या नव्या प्रवृत्तींना वळण लावलें. त्यामुळें आपलें संतवाङ्मय संमिश्र स्वरूपाचें बनलें आहे. ज्ञानेश्वर-एकनाथांच्या व नामदेव-

---

१३ A. S. Altekar—The Rashtrakutas and Their times, p. 236

१४ (अ) सेना—जडजीवा उद्धार केला । मार्ग सुपंथ दाविला ।।

(आ) नामदेव—निर्गुणींचें वैभव आलें भक्तिमिषें ।
तें हें विठ्ठलवेषें ठसावलें ।।
नामा म्हणे आम्हां अनाथांलागुनी ।
निडारलें नयनीं वाट पाहे ।।

(इ) तुकाराम—घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थितीं सांडवीन ।।
सांडवीन तपोनिधी अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ।।






तुकारामांच्या वाङ्मयाचा थाट अगदीं निराळा आहे. ज्ञानेश्वर-एकनाथांच्या वाङ्मयांत सहानुभूतीचा ओलावा आहे, दलितोद्धाराची तळमळ आहे, मानवतेचा आविष्कार आहे. पण त्यांचा प्रवाह एकमुखी व शांत आहे. उलट इतर संतांच्या अभंगवाणींत आत्मप्रकटीकरणाची धडपड आहे. त्यांच्या अंतःकरणांत सलणारी सामाजिक जीवनांतील शल्यें त्यांच्या वाङ्मयांत अधूनमधून डोकावल्याशिवाय रहात नाहींत. भावनेच्या भरांत ते सामाजिक विषमतेचा निषेध करतात; क्वचित् बंडखोरपणाचीहि भाषा बोलतात. परंतु ती तात्कालिक ऊर्मि ओसरतांच पुन्हां रूढ विचारसरणीपुढें निमूटपणें मान तुकवितात. त्यांच्या वाङ्मयांत वर्गभेदाची जाणीव आहे; पण वर्गलढ्याची तीव्रता मात्र कुठेंच नाहीं. कारण या पंथाच्या प्रवर्तकांना फक्त धार्मिक जीवनांतच समता स्थापावयाची होती. तत्कालीन समाजव्यवस्थेंत ढवळाढवळ करण्याची त्यांना गरजच भासली नाहीं. उलट व्यावहारिक व्यवसायभेद आध्यात्मिक उन्नतीच्या व धार्मिक ऐक्याच्या आड येत नाहींत अशी त्यांची खात्री होती.[१५] म्हणून त्यांनीं सर्व जातींना निरहंकार बुद्धीनें (व्यक्तित्वशून्य दृष्टीनें ?) स्वधर्माचें मनःपूर्वक परिपालन करण्याचा उपदेश केला आहे. जातिभेद हा नैसर्गिक व क्रमप्राप्तच आहे. ज्याप्रमाणें स्वतःच्या काळेगोरेपणाबद्दल कोणी तक्रार करीत नाहीं, त्याप्रमाणें विशिष्ट जातींत जन्मल्यामुळें पाळाव्या लागणाऱ्या निर्बंधांबद्दल तक्रार करण्यांत कांहीं औचित्य नाहीं अशीच त्यांची शिकवण होती.[१६]

याप्रमाणें महाराष्ट्रांतील संतचळवळ ही बव्हंशीं धार्मिक असल्यानें युरोपांतील चळवळींच्या मानानें ती फारच सौम्य व नेमस्त होती असें म्हणावें लागतें. युरोपमधील चळवळ ही प्रायः नागर जीवनाशीं निगडित होती; तर संतचळवळ खेड्यापाड्यांतूनच जास्त फैलावली. शेतकरी व कारूनारू यांच्यांतच तिचा फार लवकर प्रसार झाला. अलुतेबलुतेदारांचा वर्ग सर्वांत अधिक पिळून निघत होता, किंवा युरोपांतील व्यापारी वर्गाप्रमाणें तेराव्या शतकांत येथें नव्यानें उदयास येत होता असें मुळींच नाहीं. धार्मिक चळवळींत या वर्गानें प्रामुख्यानें भाग घेतला याचें कारण त्यांच्यावर होणारा जुलुम हें नसून त्याला मिळणारी स्वस्थता व सवड हेंच होय. त्यांचें वार्षिक उत्पन्न बांधलेलें असे. त्यामुळें लोकांचें ठराविक काम करून दिल्यावर त्याला पुष्कळच मोकळीक होती. म्हणून या चळवळीशीं हा वर्ग तत्परतेनें समरस झाला; परंतु सुरक्षिततेच्या मोहामुळें समाजव्यवस्थेविरुद्ध झगडण्यास मात्र उद्युक्त झाला नाहीं. युरोपमध्यें चर्चच्या ताब्यांत जमिनी असल्यामुळें तेथील धार्मिक चळवळीला आर्थिक असंतोषाची जोड मिळाली; व अखेर तिची समाजक्रांतींत परिणति झाली. महाराष्ट्रांतील सत्ता निरनिराळ्या संस्थांतून विभागलेली असल्यामुळें कोणत्याही संस्थेबद्दलचा असंतोष कधीं परांकोटीला गेला नाहीं; व त्या कारणानें येथें देशव्यापी बंडें उद्भवलींच नाहींत.

आपल्या अध्यात्मविचारांतही या प्रवृत्तीचीं बीजें आढळतील. सांख्यतत्त्वज्ञानाप्रमाणें विश्वव्यापार हा प्रकृतीच्या गुणांचा खेळ आहे; आत्मा हा स्वभावतः अकर्ताच आहे; तो केवळ सत्तारूप आहे. सृष्टीच्या घडामोडींत त्याला काडीचाही बदल करतां येत नाहीं. मात्र त्यापासून अलिप्त राहून त्रिगुणांच्या पाशांतून तो मुक्त होऊं शकतो. ह्या आपल्या जीवनाविषयक दृष्टिकोनांत आत्मस्वातंत्र्य

---

१५ सांगें शूद्रघरीं आघवीं । पक्वान्नें आहाति बरवीं ।
तीं द्विजें केवीं सेवावीं । दुर्बळु जरी जाहला ॥

—ज्ञानेश्वरी, ३–२२१

१६ तैसें वर्णाश्रमवशें । जें करणीय आलें असे ।
गोरेया आंगा जैसें । गोरेंपण ॥

—ज्ञानेश्वरी, १८–८८७

( Freedom ) आहे; पण इच्छास्वातंत्र्य ( Free Will ) नाहीं. त्यामुळें बाह्य परिस्थितीत हवा तो बदल घडवून आणण्याचा, निसर्गावर हुकमत गाजविण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. लौकिक जीवनांतील आपआपलीं कर्तव्यें यथासांग पार पाडीत असतांही आत्म्याची अलिप्तता ढळूं न देणें हेंच आपल्या आध्यात्मिक जीवनाचें अंतिम साध्य आहे.[१७] त्यामुळें बाह्य जीवन आणि आंतर जीवन यांचा स्वाभाविक संबंध सुटतो.[१८] बाह्य जीवन दरिद्री असतांनाही आंतर जीवन समृद्ध बनूं शकतें. बाह्य सृष्टींत प्रचंड कोलाहल माजला, तरी मनःशांतींत बिलकुल बिघाड होत नाहीं. त्यामुळें परिस्थितींत आमूलाग्र बदल घडवून आणण्याची यातायात न करतां बाह्यतः तिच्याशीं जुळतें घेण्याची व तत्त्वतः तिच्याबद्दल उदासीन राहण्याची प्रवृत्ति पोसली जाते. संत-चळवळींतही हीच मूलभूत प्रवृत्ति प्रतिबिंबित झाली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

### भक्ति ही पळवाट नव्हे !

संतांच्या चळवळींत धर्मसुधारणेची व लोकजागृतीची भावना असली, तरी समाज-क्रांतीची उठावणी नव्हती. एवढ्यावरून त्यांचा भक्तिमार्ग ही एक पळवाट होती असें म्हणतां येत नाहीं. ऐहिक दुःखांचा व दैन्याचा विसर पाडून मनुष्याला कोणत्या तरी काल्पनिक वातावरणांत गुंगवून ठेवणाऱ्या प्रवृत्तीला पळवाट हें नांव शोभेल. परंतु वारकरी-पंथानें तर स्त्री-शूद्रांतील जडत्व नाहींसें करून त्यांच्या जीवनांत एक कार्यप्रवर्तक निष्ठा उत्पन्न केली. शास्त्रीय शोधांच्या अभावीं बाह्य सृष्टीवर प्रभुत्व गाजविण्याची उमेद जोंपर्यंत मानवामध्यें नव्हती, तोंपर्यंत त्यांच्या व्यक्तिविकासाला आध्यात्मिक अधिष्ठानाची निःसंशय गरज होती. म्हणूनच ज्ञानेश्वरादिकांनीं महाराष्ट्रांतील लक्षावधि लोकांच्या निःसत्त्व जीवनक्रमाला अध्यात्मज्ञानाची जोड मिळवून दिली. त्यामुळें त्यांना आपल्या दुःखांचा विसर पडला नाहीं, तर आपल्यांतील सुप्त शक्तींची व भावनांची जाणीव झाली; पराभूतपणाची वृत्ति नाहींशी होऊन प्रतिकूल परिस्थितीला कणखरपणानें तोंड देण्याची त्यांच्या मनाची तयारी झाली. नुसत्या नामसंकीर्तनाचा प्रचार करूनच हे संत थांबले नाहींत; तर आपल्या आचरणाच्या व ग्रंथांच्या द्वारें अंतःशुद्धि, कर्तव्यनिष्ठा, भूतदया, क्षमाशीलता, परोपकार इत्यादि दैवी गुणांची त्यांनीं जोपासना केली. त्यांनीं कर्मठपणाचें बंड मोडलें; पण कर्मप्रवृत्तीचा नाश केला नाहीं. त्यांनीं पाढिकतेचा निषेध केला; पण डोळसपणाचा आग्रह सोडला नाहीं. त्यांच्या भागवतधर्मांत विवेक आणि नीति यांना फार मोठें स्थान आहे.[१९]

---

१७ जो अंतरीं दृढु । परमात्मरूपीं गूढु ।
बाह्य भागू तरी रूढु । लौकिकु जैसा ॥

—ज्ञानेश्वरी, ३–६८

१८ योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणा सळु न पडे ।
परी महाभूतांचें दळवाडें । उभारी भले ॥
पैं मूर्तीचेनि मेळें । तो मूर्तचि होऊनि खेळे ।
परि अमूर्तपण न मैळे । दादुलयाचें ॥

—ज्ञानेश्वरी, ५–७८, ८१

१९ (१) जयां भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती ।
जयांचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥

—ज्ञानेश्वरी, ९–१९२

(२) मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं ।

—ज्ञानेश्वरी, ४–५४







मनुष्याचा मोठेपणा हा त्याच्या सामाजिक प्रतिष्ठेवर नसून वैयक्तिक चारित्र्यावर आहे ही गोष्ट त्यांनी पुनःपुन्हां आवर्जून सांगितली. सामाजिक विषमतेमुळें निर्माण झालेला बहुजनसमाजांतील न्यूनगंड नाहींसा करून त्याच्या प्रगतीला उपकारक होतील अशीं नवीं मूल्यें प्रचारांत आणण्याची त्यांची खटपट होती. सनातनी पंडितांचा विरोध त्यांनीं शांतपणें सहन केला; पण आपल्या मार्गापासून ते रेसभरही ढळले नाहींत. 'विष खावें ग्रासोग्रासीं' अशा बाण्याची संतांची ही आत्मनिष्ठा व बुद्धीला बधिरता आणणारी पलायनवादी वृत्ति यांत जमीन-अस्मानाचा फरक आहे. "एक तटस्थ मानसीं। एक सहजाचि आळसी। दोन्ही दिसती सारखीं। वर्म जाणे तो पारखी॥" हें तुकारामाचें वचन या बाबतींत ध्यानांत घेण्यासारखें आहे. तेव्हां संत-चळवळ ही सामाजिक लढ्यापासून लोकांना परावृत्त करणारी प्रतिगामी शक्ति नसून धार्मिक जीवनाच्या कक्षेत त्यांच्या हक्कासाठीं सनदशीरपणें झगडणारी सुधारणावादी प्रवृत्तीच होती.

## लोकसंख्या आणि अन्न यांची तोंडमिळवणी कशी होईल ?

इ. स. १६४० मध्यें जगाची लोकसंख्या ५० कोटी होती, ती १९०० सालीं १६० कोटि झाली; आज १९४९ सालीं तीच २३० कोटि झाली आहे. दर वर्षाला २ कोट लोकसंख्या वाढते आहे म्हणजे दररोज प्रत्येक ३ सेकंदामागें दोन अपत्यांची भर पडत आहे. शास्त्रीय प्रगति जसजशी होत जाईल तसतशी दोन अपत्यांऐवजीं तीन अपत्यें असेंहि प्रमाण होईल. हल्लींचें लोकसंख्येचें वाढीचें प्रमाण जर गृहीत धरलें, तर आणखी ५० वर्षांनीं हीच लोकसंख्या ३३० कोटि होईल !

३३० कोटि लोकांच्या पोषणाला पुरेसें अन्न निर्माण करायला ५०० कोटि एकर जमीन अंदाजें लागेल. आज जगांत हवापाण्याच्या (climatically suited) दृष्टीनें योग्य अशी जमीन ११०० कोटि आहे. त्यापैकीं हल्लीं अन्नधान्याच्या लागवडीखालीं असलेली जमीन सुमारें ३४० कोटि एकर असली तरी त्यापैकीं उत्तम सुपीक अशी पहिल्या प्रतीची जमिन १०० कोटि एकरच आहे असें म्हणतात. आतां पुढील ५० वर्षांत पुरेसें अन्न निर्माण करायला जी जादा १६० कोटि एकर जमीन लागणार आहे, ती मिळून लागवडीखालीं आणतां येईल का, हाच मुख्य प्रश्न आहे. याशिवाय पाट-बंधारे, कालवे यांमुळें लागवडीखालील जमीनीच्या क्षेत्रफळांत घट होत असते; त्याचप्रमाणें जमिनीची धुपणीहि होत असून ती नापीकही होत जाते या, गोष्टी लक्षांत ठेवणें जरूर आहे.

शास्त्रीय शोधांच्या साहाय्यानें नापीक जमीनही सुपीक केली जात असून अधिकाधिक क्षेत्रफळ लागवडीखालीं आणलें जात आहे. त्याचबरोबर जमिनीचा विस्तार वाढविण्यापेक्षां आहे त्या जमिनीचा कस वाढवून तिच्यांतून अनेक पिकें (intensive cultivation) काढतांही येणें शक्य झालें आहे. ज्या जमिनीवर ५ माणसांचें पोट भागतें त्याच जमिनीवर १५–२० माणसांचें पोट भरणें यामुळें शक्य झालें आहे. पण यालाही कांहीं मर्यादा आहेच. एका विशिष्ट मर्यादेनंतर सृष्टीवर विजय मिळविणें, तिला काबूंत ठेवणें सोपें नसतें. अशा प्रकारें जी सृष्टीची आपण बेफिकीरपणें गठडी वळीत आहोंत, तें तिला कदाचित् सहन होणार नाहीं, अशीही शंका यायला जागा आहे (There is always the lurking suspicion that nature may resent being unceremoniously bundled out in this way). अर्थात् आपण प्रयत्न हा चालू ठेवलाच पाहिजे. शास्त्रीय संशोधनानें झालेलें ज्ञान आणि त्याचा प्रत्यक्ष व्यवहारांत उपयोग यांत निदान ५० वर्षांचें अंतर असतें हें स्थापत्यविशारदांचें म्हणणें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे.

**—सर जॉन रसेल**, न्यूकॅसल (३१–८–४९)
'ब्रिटिश शास्त्रीय प्रगतिसंस्थे'च्या १११ व्या वार्षिक बैठकीच्या वेळच्या अध्यक्षीय भाषणांतून.









अनुक्रमणिका

श्री. रंगराव दिवाकर

# शांतिधामाचा यात्रिक

## राजकारणी नि शांततावादी दोघेही दिङ्मूढ

एकीकडे जगांतील देशभक्त आणि राजकारणी आपण स्वतःच निर्माण केलेल्या प्रश्नांच्या जाळ्यांत गुरफटून जाऊन सत्तेचें राजकारण खेळत आहेत; जगांत शांतता प्रस्थापित करण्याच्या मिषानें त्यांना युद्धज्वर जडला असून त्या उन्मादांत त्यांनीं युद्धाची पिसाट तयारी चालविली आहे! दुसरीकडे जगांतील शांततावाद्यांना आणि तत्त्वज्ञांना भावी अनर्थाची धास्ती वाटत असून ते बिचारे शांतिप्रस्थापनेला युद्धाशिवाय अन्य कांहीं उपाय आहे काय, याचा चांचपडत शोध करीत आहेत! आपल्या मार्गानें शांतता येणार नाहीं, हें न समजण्याइतका खुळा किंवा अंधळा राजकारणी पुरुष खचित नाहीं. पण तोही लाचारीची सबब पुढें करीत आहे. "त्या दुसऱ्यानें आपलें शस्त्र खालीं ठेवावें कीं, मीही लगेच निःशस्त्र होतों" असें त्याचें म्हणणें आहे! राजकारणी पुरुष युद्धाच्या दुश्चक्रांत सांपडला असून त्यांतून तो सुटणें अशक्य आहे याची शांततावाद्याला जाणीव आहे; परंतु त्यालाही कांहीं दुसरा उपाय सुचवितां येत नाहीं. जीवनांतील जिव्हाळ्याच्या प्रश्नांशीं ज्या तत्त्वज्ञानाचा संबंध येत नाहीं, जें तत्त्वज्ञान ते प्रश्न सोडविण्याबाबत कार्यपद्धति शोधून काढूं शकत नाहीं, तें तत्त्वज्ञान हें खरें तत्त्वज्ञान नव्हेच! म्हणून राजकारणी काय किंवा शांततावादी काय, दोघेही युद्धपरिहार कसा करावा आणि शांति कशी स्थापावी या बाबतींत दिङ्मूढ झाले आहेत! एकजण विचारा हिंसेची पाळेंमुळें निर्मूल करण्याच्या वेड्या आशेनें पुन्हां त्या हिंसेच्या मुळांचेंच संवर्धन करीत आहे, तर दुसरा बापडा आपल्या भाईच्या मूर्खपणाबद्दल हळहळत असून लाचारीनें कपाळाला हात लावून बसला आहे! राजकारणी मुत्सद्द्यांजवळ युद्धनिवारणाचें सामर्थ्य आहे पण कार्यक्षम इच्छा नाहीं; उलट, शांततावाद्याजवळ इच्छा आहे खरी; परंतु ती कृतींत उतरविण्याचें सामर्थ्य नाहीं!

## मानवी संस्कृतीनें गांठलेला प्रचंड टप्पा!

अशा दिङ्मूढ मनःस्थितींत संभ्रान्तचित्त होऊन आपण कोठून प्रकाश मिळतो का म्हणून पाहूं लागावें तों गांधींजी क्षितिजावर अकस्मात् दृग्गोचर होऊन मार्गदर्शन करतांना दिसतात! आरंभींची दक्षिण आफ्रिकेंतील थोडीं वर्षें सोडून दिलीं तर त्यांचें सर्व जीवनकार्य हिंदुस्थानांतच झालेलें दिसून येतें. लहानमोठे सर्व प्रकारचे प्रश्न त्यांनीं हातीं घेतले. उत्तरायुष्यांत जेथें ते रहात होते त्या ग्रामाच्या सुधारणेचा प्रश्न असो, कीं चाळीस कोट लोकांच्या सामाजिक, आर्थिक आणि राजकीय स्वातंत्र्याचा प्रश्न असो, या दोन्हींही गोष्टींत त्यांचें मन सारखेंच रमत असें. परदेशाहून त्यांना किती तरी निमंत्रणें आलीं, मित्रांनीं किती आग्रह केला! परंतु हिंदुस्थानमधील कार्यक्षेत्रालाच ते शेवटपर्यंत चिकटून राहिले. "हेंच माझें कार्यक्षेत्र आहे. येथें यशस्वी झाल्याशिवाय हिंदुस्थानाबाहेर मला कांहीं कर्तव्य नाहीं" असें ते म्हणत. कोणतेंही क्षुद्र काम जरी करीत असले तरी त्यांचें लक्ष एकाच महाप्रश्नावर केंद्रित असे. तो महाप्रश्न म्हणजे युद्ध कीं शांति? याचें प्रत्यक्ष प्रत्यंतर त्यांच्या शोकजनक मृत्यूनंतर उज्ज्वलपणें दिसून आलें. शांतिधामाच्या या यात्रिकाचें जगांतील सर्व देशोदेशींच्या दूरदूरच्या लोकांनीं जें गुणसंकीर्तन केलें, जी श्रद्धांजलि अर्पण केली, तीं सर्व



अनुक्रमणिका






किती उत्स्फूर्त व अंतःकरणापासून प्रकट झालेली होती!

गांधीजींच्या जीवनांत जर कोणता एक ध्यास असेल तर तो हा होता कीं, " सर्वेऽत्र सुखिनः सन्तु " ( Peace on earth and good will unto all men ) या वचनाप्रमाणें सर्वांना शांति आणि सुख देणारा असा व्यवहार्य अहिंसात्मक उपाय कोणता, तो शोधून काढणें. लहानपणापासूनच हा महात्मा अहिंसात्मक मार्गानें सत्याचें अन्वेषण करीत होता. जें सत्य अहिंसेनें प्राप्त होत नसेल, ज्या सत्याला हिंसेचा विटाळ झाला असेल, त्या सत्याच्या सत्यत्वाबद्दलच त्यांना शंका येत असे! हिंसा—मग कोणत्याही स्वरूपाची असो—वगळून बाकीच्या कोणत्याही गोष्टींशीं ते तडजोड करावयास तयार असत. त्यांची हिंसेची कल्पना रक्तपातापुरतीच मर्यादित नव्हती; त्यांत वाचिक, मानसिक, आध्यात्मिक हिंसाही अंतर्भूत होती. अशी सर्व प्रकारची हिंसा नाहींशी करण्याचा त्यांचा कांटेकोरपणें व कठोरपणें प्रयत्न चालू होता. त्यांच्या अहिंसेच्या कल्पनेंत कोणाही प्राणिमात्राची वाचेनें, मनानें आणि कृतीनें हिंसा न करणें एवढेंच नसून त्या अहिंसेंत प्रेम, दया, सर्वभूतहितबुद्धीनें केलेलीं सुकृत्यें यांचाही अंतर्भाव होत होता. " आत्मवत् सर्वभूतानि " किंवा " आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति " ( Do unto others as you would be done by ) एवढेंच पुरेसें नाहीं, असें ते म्हणत. याहीपुढें जाऊन, दुसऱ्याला आपल्या स्वतःपेक्षांही अधिक चांगल्या रीतीनें वागविलें पाहिजे, असें त्यांचें ब्रीद होतें. केवळ 'शेजाऱ्यावर प्रेम करावयाच्या' ऐवजीं सर्व प्राणिमात्रांवर प्रेम करावयास त्यांना हवें होतें. " स्त्रीकडे वाईट नजरेनें पाहूं नका " हा मोझेस्चा आदेश; तर खाइस्ट्चा ' स्त्रीविषयीं कामुकतेचा विचारही मनांत आणूं नका ' असा संदेश. या दोन्हीही संदेशांमध्यें मानवी संस्कृतीनें मोठा पल्ला गांठला हें खरें. पण त्याही पुढें 'पापाचा प्रतिकार करूं नका' या खाइस्ट्च्या वचनापासून गांधीजींच्या " पापाचा प्रतिकार तर तुम्हांला केलाच पाहिजे. पण तो वाईटाचा चांगल्यानें करा " या वचनापर्यंत संस्कृतीनें केवढा प्रचंड टप्पा गांठला आहे!

## हिंसाशस्त्र परमेश्वरच वापरूं शकेल!

वैयक्तिक मोक्ष, सर्व प्रकारच्या दुर्वासनांपासून मुक्तता ही गांधीजींना हवी होती हें खरें; परंतु त्यांची मोक्षाची कल्पना येथेंच थांबली नाहीं. मानसिक, वाचिक, शारीरिक हिंसेच्या आहारीं गेलेल्या मानव समाजाला त्यांतून मुक्त करणें ह्या गोष्टींची वैयक्तिक मुक्ति ही त्यांची प्रस्तावना आणि साधना होती. त्यांच्या दृष्टीनें केवळ हिंसाच नव्हे तर हिंसेला सहायभूत होणाऱ्या गुप्तता वगैरे गोष्टीही पापच होत! पापाविरुद्ध वापरावयाचें एक शस्त्र म्हणून हिंसेला जर कोठें जागा असेल तर ती परमेश्वराच्याच शस्त्रागारांतच असणें शक्य आहे. कारण परमेश्वरच अहंकारापासून आणि आसक्तीपासून संपूर्णपणें आलिप्त असूं शकतो ( गीता १८,१७ ). दुसरा कोणीही जर हें शस्त्र वापरावयाचें मनांत आणील तर तो गोत्यांतच येईल! कारण हिंसारूपी शस्त्र वापरावयाला लागणारी संपूर्ण पात्रता ज्याच्या अंगीं आहे असा कोणीही मायेचा पूत अजून झाला नाहीं! निरहंकारित्व व संपूर्ण अनासक्ति प्राप्त करून घेण्याचा मानवाला केवळ प्रयत्न करतां येईल, परंतु त्याला तीं कधींही प्राप्त करून घेतां येणार नाहींत. हिंसेचें शस्त्र ( boomerang ) हें असें आहे कीं तें वापरणारावरच पुन्हां उलटून त्याचा नाश करतें! म्हणून तें वापरण्याचें मनांत आणण्यापूर्वी वरील शर्ती पूर्ण झाल्या असल्या पाहिजेत. हिंसेचें फळ हिंसाच हें गांधीजींना कळून चुकलें होतें. आणि त्याऐवजीं नैतिक उपाय शोधून काढावयाची त्यांनीं आपल्या जिवाची आटापीट चालविली होती. साध्याइतकीच साधनेंही महत्त्वाचीं आहेत, किंबहुना साध्यापेक्षांही साधनेंच ज्यास्त महत्त्वाचीं आहेत, असें त्यांना वाटे. ते स्वतः किंवा त्यांचे कार्यक्रम जर कोणत्या एका गोष्टीनें विचलित होत असतील तर ती गोष्ट म्हणजे त्यांच्या स्वतःच्याच अनुयायांकडून होणारी हिंसा किंवा अत्याचार. प्रतिपक्षानें केलेल्या अत्याचारांची त्यांना कधींच भीति वाटत नसे. उलट त्यांचें ते स्वागतच करीत; परंतु आपल्या स्वतःच्याच लोकांनीं










केलेले अत्याचार त्यांना विषवत् वाटत ! 'साधनांची काळजी घ्या म्हणजे साध्याची निराळी काळजी घ्यायची जरूरी नाहीं ' असें ते कंठरवानें सांगत. ' अहिंसेला चिकटून रहा; म्हणजे सत्याचें आपोआपच रक्षण होईल ' असें ते प्रतिपादीत. आणि ही त्यांची श्रद्धा शेवटपर्यंत न डळमळतां अभंग राहिली. कित्येक वेळां त्यांना मार्ग दिसेनासा होई, चोहोंकडे अंधार वाटे; परंतु त्यांची श्रद्धा कधींही ढळली नाहीं. प्रत्येक प्रश्नाला अहिंसात्मक उत्तर असलेंच पाहिजे, असें ते आग्रहानें सांगत. अर्थात् ते कबूलही करीत कीं– ' एखादा विशिष्ट प्रश्न अहिंसात्मक रीतीनें सोडवायचें बळ माझ्यामध्यें नाहीं; मी दुबळा आणि अपात्र आहे. ''

## सर्व अहिंसात्मक शक्ती संघटित कशा करतां येतील ?

गांधीजींनीं शिकविलेली दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे ही कीं, '' वाईटाचा प्रतिकार करा आणि तो करीत असतांना पराभूत वृत्तीचे, निराश कधींच होऊं नका.'' अहिंसात्मक प्रतिकार हा उत्कृष्ट, श्रेष्ठ आणि नैतिक दृष्ट्या उच्चतम असून अत्यंत बलिष्ठाचेंच तें शस्त्र आहे. जर तें वापरावयाची आपल्यांत ताकद नसेल, तर हिंसक मार्गानें का होईना पण प्रतिकार हा केलाच पाहिजे. अहिंसक प्रतिकार जर शक्य नसेल तर त्याऐवजीं हिंसक प्रतिकार चालेल, परंतु पळपुटेपणा कदापि चालणार नाहीं ! भ्याडपणा किंवा वाईटाशीं तडजोड हे शब्द सत्याग्रह्याच्या शब्दकोशांत आढळावयाचे नाहींत. पराभूत वृत्तीला तर सत्याग्रह्याच्या मनांतही थारा नसतो; कारण सकृद्दर्शनीं वाटणारा पराभव म्हणजे आगामी विजयाची पहिली पायरी आहे. मृत्यु हा तर अहिंसेचा विजयरूपी कळस आहे. हिंसेचे भक्त असतात त्यांना तरी विजय इटकून मिळतोच असें थोडेंच आहे ! बिचाऱ्यांची जेव्हां आत्यंतिक, दारुण निराशा होते, तेव्हां त्यांचें शेवटी सांत्वन मृत्यूच करतो ! सत्याग्रह्याची गोष्ट निराळी आहे. सत्याग्रही हा सत्याग्रह-सवयांचा एक भाग म्हणून मृत्यूचें प्रसन्न वृत्तीनें स्वागतच करतो.

जागतिक शांतता प्रस्थापित करण्याच्या उपक्रमांत गांधीजींची तिसरी महत्त्वाची भर म्हणजे सामाजिक, आर्थिक, राजकीय कार्यक्षेत्रांतील पाप आणि अन्याय यांविरुद्ध अहिंसात्मक शक्ती संघटित कशा करायच्या याविषयीं त्यांनीं घालून दिलेलें तंत्र होय. पाप, जुलुम, अन्याय आणि पिळवणूक– मग तीं स्वकीयांकडून असोत कीं तथाकथित परकीयांकडून असोत— यांचा आपणांमध्यें बुजबुजाट झाला आहे. त्यांच्याशीं आपणांस झगडायचें आहे आणि तेंही अहिंसक शस्त्रांनीं झगडायचें आहे; कारण त्यांचें त्या योगानेंच पृथ्वीच्या पाठीवरून निर्मूलन होईल. त्यावर गांधीजींचा हा उपाय होता कीं, आपण आपलें आत्मसंशोधन करावें, आत्मशुद्धि करावी; स्वतःमधील दुर्वासनांचें शुद्धीकरण करावें आणि हिंसेविरुद्ध—कितीही भयंकर हिंसेच्या विरुद्ध–सर्व प्रकारच्या अहिंसक शक्ती संघटित कराव्या ह्या बाबतींत तर त्यांनीं अगदीं मुळाशीं जाऊन सबंध जगाला असें दाखवून दिलें कीं, एका मोठ्या सबंध राष्ट्राच्या राष्ट्राला चिकाटीच्या प्रयत्नांनीं, थोडें फार का होईना, परंतु अत्यंत बलाढ्य अशा हिंसक शक्तीला प्रतिकार करण्यास समर्थ असें अहिंसापालन करण्याचें शिक्षण देतां येतें ! ह्या प्रतिकाराचा मुख्य पाया म्हणजे निर्भयपणा आहे. असा प्रतिकार करायला लागणाऱ्या नेतृत्वाचें इंगित हें सेवा आणि स्वार्थत्याग ह्या गुणांमध्यें सांठवलें आहे.

## सर्व भूतमात्रांशीं ऐकात्म्यभावना

आपलें हें शस्त्र सर्व क्षेत्रांमध्यें पारखून पाहण्याची संधि व सवड गांधीजींना मिळाली नाहीं. परंतु ते आपल्या पाठीमागें हा अत्यंत मूल्यवान् वारसा ठेवून गेले आहेत ! यापुढें मानवजातीनें त्यांनीं अर्धवट टाकून दिलेले धागे हातीं घेऊन त्यांचे प्रयोग अधिकाधिक आणि जीवनाच्या सर्व क्षेत्रांतून चालू ठेविले पाहिजेत. पिळणुकीचें संपूर्ण उच्चाटन, आर्थिक, सामाजिक व राजकीय अशा सर्व क्षेत्रांतून सत्तेचें विकेंद्रीकरण आणि हें सर्व साध्य करून घेण्याकरितां समाजांतील अहिंसात्मक शक्तींचें संघटन-हें गांधीजींच्या शिकवणीचें सार म्हणतां येईल. ह्या सर्व शिकवणुकीचा उगम आणि प्रेरणा कशामधून आहे ! सव प्राणिमात्रांवरील आत्यंतिक प्रेम, व्यक्ति आणि समाज यांचे जिव्हाळ्याचे संबंध आणि

केलेले अत्याचार त्यांना विषवत् वाटत ! 'साधनांची काळजी घ्या म्हणजे साध्यांची निराळी काळजी घ्यायची जरूरी नाहीं ' असें ते कंठरवानें सांगत. 'अहिंसेला चिकटून रहा; म्हणजे सत्याचें आपोआपच रक्षण होईल ' असें ते प्रतिपादीत. आणि ही त्यांची श्रद्धा शेवटपर्यंत न डळमळतां अभंग राहिली. कित्येक वेळां त्यांना मार्ग दिसेनासा होई, चोहोंकडे अंधार वाटे; परंतु त्यांची श्रद्धा कधींही ढळली नाहीं. प्रत्येक प्रश्नाला अहिंसात्मक उत्तर असलेंच पाहिजे, असें ते आग्रहानें सांगत. अर्थात् ते कबूलही करीत कीं– 'एखादा विशिष्ट प्रश्न अहिंसात्मक रीतीनें सोडवायचें बळ माझ्यामध्यें नाहीं; मी दुबळा आणि अपात्र आहे. ''

## सर्व अहिंसात्मक शक्ती संघटित कशा करतां येतील ?

गांधीजींनीं शिकविलेली दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे ही कीं, '' वाईटाचा प्रतिकार करा आणि तो करीत असतांना पराभूत वृत्तीचे, निराश कधींच होऊं नका.'' अहिंसात्मक प्रतिकार हा उत्कृष्ट, श्रेष्ठ आणि नैतिक दृष्ट्या उच्चतम असून अत्यंत बलिष्ठाचेंच तें शस्त्र आहे. जर तें वापरावयाची आपल्यांत ताकद नसेल, तर हिंसक मार्गानें का होईना पण प्रतिकार हा केलाच पाहिजे. अहिंसक प्रतिकार जर शक्य नसेल तर त्याऐवजी हिंसक प्रतिकार चालेल, परंतु पळपुटेपणा कदापि चालणार नाहीं ! भ्याडपणा किंवा वाईटाशीं तडजोड हे शब्द सत्याग्रह्याच्या शब्दकोशांत आढळावयाचे नाहींत. पराभूत वृत्तीला तर सत्याग्रह्याच्या मनांतही थारा नसतो; कारण सकृद्दर्शनीं वाटणारा पराभव म्हणजे आगामी विजयाची पहिली पायरी आहे. मृत्यु हा तर अहिंसेचा विजयरूपी कळस आहे. हिंसेचे भक्त असतात त्यांना तरी विजय हटकून मिळतोच असें थोडेंच आहे ! बिचाऱ्यांची जेव्हां आत्यंतिक, दारुण निराशा होते, तेव्हां त्यांचें शेवटीं सांत्वन मृत्यूच करतो ! सत्याग्रह्याची गोष्ट निराळी आहे. सत्याग्रही हा सत्याग्रह-स्वधाचा एक भाग म्हणून मृत्यूचें प्रसन्न वृत्तीनें स्वागतच करतो.

जागतिक शांतता प्रस्थापित करण्याच्या उपक्रमांत गांधीजींची तिसरी महत्त्वाची भर म्हणजे सामाजिक, आर्थिक, राजकीय कार्यक्षेत्रांतील पाप आणि अन्याय यांविरुद्ध अहिंसात्मक शक्ती संघटित कशा करायच्या याविषयीं त्यांनीं घालून दिलेलें तंत्र होय. पाप, जुलुम, अन्याय आणि पिळवणूक– मग तीं स्वकीयांकडून असोत कीं तथाकथित परकीयांकडून असोत— यांचा आपणांमध्यें बुजबुजाट झाला आहे. त्यांच्याशीं आपणांस झगडायचें आहे आणि तेंही अहिंसक शस्त्रांनीं झगडायचें आहे; कारण त्यांचें त्या योगानेंच पृथ्वीच्या पाठीवरून निर्मूलन होईल. त्यावर गांधीजींचा हा उपाय होता कीं, आपण आपलें आत्मसंशोधन करावें, आत्मशुद्धि करावी; स्वतःमधील दुर्वासनांचें शुद्धीकरण करावें आणि हिंसेविरुद्ध—कितीही भयंकर हिंसेच्या विरुद्ध—सर्व प्रकारच्या अहिंसक शक्ती संघटित कराव्या ह्या बाबतींत तर त्यांनीं अगदीं मुळाशीं जाऊन सबंध जगाला असें दाखवून दिलें कीं, एका मोठ्या सबंध राष्ट्राच्या राष्ट्राला चिकाटीच्या प्रयत्नांनीं, थोडें फार का होईना, परंतु अत्यंत बलाढ्य अशा हिंसक शक्तीला प्रतिकार करण्यास समर्थ असें अहिंसापालन करण्याचें शिक्षण देतां येतें ! ह्या प्रतिकाराचा मुख्य पाया म्हणजे निर्भयपणा आहे. असा प्रतिकार करायला लागणाऱ्या नेतृत्वाचें इंगित हें सेवा आणि स्वार्थत्याग ह्या गुणांमध्यें सांठवलें आहे.

## सर्व भूतमात्रांशीं ऐकात्म्यभावना

आपलें हें शस्त्र सर्व क्षेत्रांमध्यें पारखून पाहण्याची संधि व सवड गांधीजींना मिळाली नाहीं. परंतु ते आपल्या पाठीमागें हा अत्यंत मूल्यवान् वारसा ठेवून गेले आहेत ! यापुढें मानवजातीनें त्यांनीं अर्धवट टाकून दिलेले धागे हातीं घेऊन त्यांचे प्रयोग अधिकाधिक आणि जीवनाच्या सर्व क्षेत्रांतून चालू ठेविले पाहिजेत. पिळणुकीचें संपूर्ण उच्चाटन, आर्थिक, सामाजिक व राजकीय अशा सर्व क्षेत्रांतून सत्तेचें विकेंद्रीकरण आणि हें सर्व साध्य करून घेण्याकरितां समाजांतील अहिंसात्मक शक्तींचें संघटन-हें गांधीजींच्या शिकवणीचें सार म्हणतां येईल. ह्या सर्व शिकवणुकीचा उगम आणि प्रेरणा कशामधून आहे ! सव प्राणिमात्रांवरील आत्यंतिक प्रेम, व्यक्ति आणि समाज यांचे जिव्हाळ्याचे संबंध आणि








प्रत्येक प्राणिमात्राशीं ऐक्यभावनेचा जिवंत अनुभव यांमधून गांधीजींच्या शिकवणुकीचा उगम आहे. या ऐक्यभावनेचाच एक उपसिद्धांत म्हणजे अहिंसा होय. जें जें स्फुरणशील आणि जिवंत आहे अशा प्रत्येक जीवमात्राशीं एकात्मभावनेचा जो अनुभव त्याचा प्रत्यक्ष व्यवहारांत आविष्कार कोणता? जगांत जें पापमय आणि हिंसक, त्यापासून मानवतेला मुक्त करण्याचा मनाला लागलेला निदिध्यास हाच त्या ऐक्यानुभवाचा व्यावहारिक आविष्कार होय. ज्यांना ज्यांना जगांत शांति नांदावी म्हणून प्रयत्न करावयाचे असतील त्यांनीं ह्या तादात्म्यभावनेपासूनच सुरुवात करून ती अंगीं बाणविली पाहिजे; नाहींतर त्यांचे सर्व प्रयत्न वाळूच्या भुसभुशीत पायावरील इमल्याप्रमाणें नश्वर ठरतील! गांधींचीं सर्व विधायक कार्यें हीं मानवप्रेमावर उभारलेलीं होतीं आणि अहिंसक समाजाची नवीन संघटना बनविणें हा त्यांचा उद्देश होता. तीं विधायक कार्यें म्हणजे सत्याग्रहाच्या जीवन-पद्धतींतील एक भाग होता.

गांधीजींचें वर्णन आध्यात्मिक अराज्यवादी म्हणून करतां येईल. जेथें व्यक्ति आणि समूह हे स्वयंपूर्ण असून स्वयंशासित आहेत, अशा प्रकारच्या समाजाचें ध्येयचित्र त्यांच्या डोळ्यापुढें होतें. परंतु अर्थातच हें ध्येय दूरच्या भविष्यकाळांतच साध्य होणारें होतें. तथापि गांधीजी हे व्यवहारी ध्येयवादी होते. त्या दृष्टीनें त्यांना, स्वतंत्र राष्ट्रांचें एक जागतिक संघराज्य लवकर स्थापिलें जावें, सर्वांना समान असे जागतिक नागरिकत्वाचे हक्क लवकर मिळावेत, असें वाटत होतें. त्यांच्या जीवनाचें समालोचन केलें तर ते शान्तिसेनेंतील अत्यंत शूर आणि कार्यक्षम असे सैनिक होते असें दिसून येईल. त्यांनीं पापाविरुद्ध—अंतर्गत त्याचप्रमाणें बाह्य, वैयक्तिक त्याचप्रमाणें सामाजिक अशा पापांविरुद्ध—अविरत युद्ध चालविलें होतें. वाईटाचा चांगल्यानें प्रतिकार करणें हा त्यांच्या कार्यपद्धतीचा प्राण होता; आणि वाईटाशीं तडजोड करणें, वाईटाची उपेक्षा करणें किंवा त्याच्याशीं सहकार्य करणें या गोष्टी त्यांना मृत्यु—किंवा आत्महत्येसमान होत्या. त्यांनीं आपलीं तत्त्वें आपल्या जीवनामध्यें प्रतिपादून तीं शक्य तों प्रत्यक्ष आचरणांत आणलीं असलीं तरी राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत अजून त्या तत्त्वांचा विकास आणि आचरण घडून यावयाचेंच आहे.

---

## सेवकाची प्रार्थना

हे नम्रतेच्या सम्राटा!

दीन भंग्याच्या चंद्रमौळी झोंपडींतील निवासी!

गंगा, यमुना आणि ब्रह्मपुत्रा यांच्या जलानें सिंचित अशा या सुंदर देशामध्यें ठिकाठिकाणीं तुला शोधून काढण्याच्या कामीं आम्हांला साहाय्य कर.

आम्हांला ग्रहणशीलता आणि मोकळें हृदय दे.

तुझी स्वतःची नम्रता आम्हांला दे.

हिंदुस्थानच्या जनतेशीं एकरूप होण्याची शक्ति आणि उत्कंठा आम्हांला दे.

हे भगवन्!

जेव्हां मनुष्य शून्य बनून तुला शरण येतो तेव्हां तूं मदतीकरितां धावून येतोस.

ज्या जनतेची सेवा आम्ही तिचे सेवक आणि मित्र या नात्यानें करूं इच्छितों, त्या जनतेपासून आम्ही कधीं दुरावूं नये, असें आम्हांला वरदान दे.

त्याग, भक्ति आणि नम्रता हीं मूर्तिमंत आमच्या ठिकाणीं अवतरूं दे. म्हणजे त्या योगानें या देशाचें आम्हांला अधिक ज्ञान होऊन, आम्ही त्यावर प्रेम करूं.

महात्मा गांधी, १२–९–३४

[ मिस् लिन्फोर्थ ह्यांना पाठविलेल्या मूळ इंग्रजी प्रार्थनेच्या 'सर्वोदय'च्या सप्टेंबर १९४९ अंकांतील हिंदी अनुवादावरून. ]







डॉ. के. ना. वाटवे

# ' क्रान्ति ' हा एक नवा व स्वतंत्र 'रस' नाहीं

## रसस्थापनेस आवश्यक गोष्टी

एकाद्या नव्या व स्वतंत्र रसाची स्थापना रसमंडळांत करावयाची असल्यास त्यासाठीं पुढील चार गोष्टींची सिद्धता दाखविली पाहिजेः

१ त्या नव्या रसानें युक्त असें एकाद्या सत्कवीचें रसिकमान्य काव्य.

२ विभाव, अनुभाव व व्यभिचारी भाव अशी त्या काव्यांतील रससामग्री.

३ त्या रससामग्रीनें अभिव्यक्त किंवा जागृत होणारा रसिकाचा स्थायी भाव.

४ तो स्थायी भाव व तो रस यांतील परस्परसंबंधामुळें उचित वाटणारें रसाचें नांव.

' क्रान्ति ' नांवाच्या नव्या व स्वतंत्र रसाची स्थापना करतांना आचार्य जावडेकरांनीं वरील गोष्टींपैकीं कोणत्या गोष्टींची सिद्धि कशी केली आहे ती पाहूं; व त्यावरून हा नवा रस उपपन्न होतो कीं काय तें ठरवूं. जावडेकरांची योजना अनुक्रमें पुढीलप्रमाणें आहेः

१ क्रान्तिरसानें युक्त असें केशवसुत या सत्कवीचें रसिकमान्य काव्य म्हणजे त्यांचीं क्रान्तिगीतेंच. त्यांतल्या त्यांत 'स्फूर्ति', 'नवा शिपाई' व ' मूर्तिभंजन ' हीं लेखांतील उद्धृत गीतें.

२ समाजांत चालू असलेल्या नव्या-जुन्यांचा संघर्ष हा क्रान्तिरसाचा आलंबनविभाव. इतर दोन सांगितलेच नाहींत.

३ नवी समाजसृष्टि निर्माण करण्याची वृत्ति, नवनिर्मिति, त्या निर्मितीची भावना आणि त्या निर्मितीचा आनंद असा चार ठिकाणीं शब्दभेदानें सांगितलेला स्थायी भाव. मात्र हा क्रान्तिकारकाचा.

४ तो स्थायिभाव व 'क्रान्ति' यांतील परस्परसंबंध न दाखवितां रसनाम उचित आहे, असें गृहीत धरलेलें आहे.

## क्रांतिरसाचा स्थायी भाव कोणता ?

आतां याचें परीक्षण त्याच अनुक्रमानें करूं:—

१ केशवसुतांच्या कवितांपैकीं आठदहा कवितांत समाजक्रांतीला चालना देणाऱ्या कांहीं भावना उत्कटपणें आस्वाद्य आहेत याबद्दल दुमत नाहीं.

२ नव्याजुन्यांचा संघर्ष हा लौकिक क्रांतिघटनेचा स्थूल विषय आहे. तो अलौकिक अशा क्रांतिरसाचा काव्यगत आलंबनविभाव नव्हे. ज्या ज्या क्रांतिकाव्यांत जी जी भावना उत्कटपणें आस्वाद्य झाली असेल त्या भावनेच्या अनुरोधानें प्रतिगामी विचारसरणीचे हट्टी पुरस्कर्ते, अंधरूढीवाले, जुलमी, ढोंगी, आळशी व मेणचट लोक, दलित व दुर्गत समाज इत्यादि आलंबनविभाव दिले पाहिजेत. विभावांपैकीं उद्दीपनविभाव लेखांत मुळींच दिले नाहींत. अनुभावांचा उल्लेख नाहीं, व व्यभिचारी किंवा संचारी भाव स्पष्ट सांगितले नाहींत. त्यांची अस्पष्ट कल्पनाच व्यक्त करण्यांत आली आहे. यावरून असें वाटतें कीं क्रांतीची रसदृष्ट्या चर्चा करून तिला रसपरिभाषेच्या चौकटींत बसविण्याकडे श्री. जावडेकरांचें जें लक्ष असावयास पाहिजे होतें तें क्रांतीचें तत्त्वज्ञान सांगण्याकडे अधिक वेधलेलें दिसतें. याचा अधिक पुरावा पुढें मिळेल.

३ स्थायी भाव म्हणून जावडेकरांनीं दिलेल्या पहिल्या दोन गोष्टी मुळीं स्थायी भाव नाहींतच. तिसरी संदिग्ध व चौथी व्यभिचारी भावना आहे. रसिकाच्या मनांत संस्कारांच्या म्हणजे पूर्ववासनाबीजांच्या रूपानें नित्य असणारी पण काव्यांतील










अनुक्रमणिका

विभाव, अनुभाव व व्यभिचारी भाव या रससामग्रीनें प्रबुद्ध होऊन भावरूपानें प्रगट होणारी, प्रमुख, स्थिर आणि आस्वाद्य अशी भावना म्हणजे स्थायी भाव. जसें, काम, भय, क्रोध, वात्सल्य, जुगुप्सा, विस्मय इत्यादि. या स्थायी भावांच्या लक्षणांवरून हें ध्यानीं येईल कीं तो स्थायी भाव ही भावना असावी लागते व ती काव्यवाचनानें रसिकाच्या ठिकाणीं जागृत व्हावी लागते. जावडेकरांनीं स्थायी भाव म्हणून दिलेले चारहि पर्याय स्थायी भाव या संज्ञेस पात्र नाहींत व ते रसिकाचे नसून क्रांतिकारकाचे आहेत. नुसती 'नवनिर्मिति' ही क्रिया आहे, भावना नव्हे. नवी समाजसृष्टि निर्माण करण्याची वृत्ति ही सुद्धां भावना नसून विशिष्ट क्रिया करण्याकडे निश्चितपणें कललेली व प्राधान्येंकरून ज्ञानात्मक मनोऽवस्था आहे. यामुळें तिला cognitive mental attitude म्हणतां येईल. त्याचप्रमाणें तिच्यामध्यें इच्छा व क्रिया-प्रेरणा असल्यानें ती conative हि आहे. पण तिच्यामध्यें निश्चित असा कोणताच भावनात्मक अंश निर्माण झालेला नाहीं. व्यक्तिगत वृत्तीला temperament म्हणतात व सामुदायिक किंवा समाजगत वृत्तीला tendency किंवा attitude हे शब्द लावतात. एखाद्या विशिष्ट वृत्तीनें मनुष्य एखादें कार्य करूं लागला म्हणजे मग त्या कार्यांतील अडथळे, सौलभ्य, यशापयश, प्रतिकार इत्यादींमुळें त्याच्या मनांत क्रोध, उत्साह, आनंद, आशा, निराशा वगैरे भावना उत्पन्न होतात. पण मूळ वृत्ति मात्र भावनात्मक नव्हे.

आतां 'नवसमाजनिर्मितीची भावना' किंवा 'नवनिर्मितीचा आनंद' म्हणजे काय तें पाहूं. कांहीं मानसशास्त्रज्ञ नवनिर्मिति (Construction) ही एक उपजत सहजप्रवृत्ति (Instinct) मानतात आणि आपण कांहीं नवीन उत्पन्न करीत आहोंत याच्या सुखद जाणिवेला (Feeling) किंवा आत्म-कौशलमत्त्वाच्या भावनेला या उपजत प्रवृत्तीची सहचर भावना समजतात. नवनिर्मितीची ही प्रवृत्ति घरटीं बांधणारे पक्षी व जाळीं विणणारे कोळी आदीकरून कीटक यांत दिसते. माणसामध्यें ती उन्नीत स्वरूपांत प्रगट होऊन कलाकौशल्याचीं कामें व इतर मोठ्या उदात्त रचना यांत परिणत होते.

क्रांतिकारकांची 'नवसमाजनिर्मितीची भावना' किंवा 'आनंद' तो याच प्रकारचा असें लेखकास म्हणावयाचें असल्यास ही एकटी भावना काव्या-मध्यें स्वतंत्रपणें किंवा उत्कटपणें आस्वाद्य कधींच झालेली नाहीं. आनंद ही भावना व्यभिचारी किंवा संचारी (Derived) असल्यानें स्थायित्व पावतच नाहीं व स्वतंत्रपणें आस्वाद्य होत नाहीं. आतां, क्रांतिकार्यांतील नवसमाजनिर्मितीच्या भावनेला जें रसत्व आल्यासारखें वाटतें तें त्या निर्मितिभावने-मुळेंच नसून क्रांतीची प्रचंड घटना चालू असतां क्रांतिकारकाला कराव्या लागणाऱ्या झगड्यांच्या वर्णनामुळें येतें. निदान केशवसुतांपुरतें बोलावयाचें तर त्यांचीं खरीं आस्वाद्य क्रांतिगीतें योद्ध्यांच्या आवेशानेंच जास्त भारलेलीं आहेत. पण याचा अधिक विचार पुढें करूं.

स्थायी भावांबद्दल जावडेकरांनीं वरील चार चुकीचे पर्याय योजले याचें कारण असें वाटतें कीं तें क्रांतिकारकाची मनोभूमिका डोळ्यासमोर धरून विचार करीत आहेत. क्रांतिकाव्याचें वाचन व तें काव्य वाचणाऱ्या रसिकाची चित्तवृत्ति त्यांच्या गांवींही नाहीं. तसें नसतें तर त्यांनीं क्रांतिकारकाची मनोवृत्ति हा स्थायी भाव मानला नसता. त्याच-प्रमाणें येथें अशीहि शंका येते कीं त्यांनीं स्थायी भाव ही पारिभाषिक संज्ञासुद्धा प्रेरक, प्रभावी किंवा आधारभूत तत्त्व या सामान्य अर्थानें वापरलेली असावी. काव्यगत व्यक्तीच्या मनांत एकादी उत्कट भावना निर्माण झाली कीं तिचे निदर्शक म्हणून जे फेरबदल त्या व्यक्तीच्या शरीरावर व्यक्त होतात त्यांना अनुभाव (Expressions of the emotion) म्हणतात. त्यांचा सदर लेखांतील अनुल्लेख असें दर्शवितो कीं क्रांतिकाव्यवाचनापेक्षां क्रांतितत्त्व-चर्चाच लेखकाच्या मनासमोर प्राधान्येंकरून आहे.

क्रांतिकारकाच्या मनोवृत्तीच्या वर्णनांत अनेक भावनांचा उल्लेख करून त्यांना आचार्य जावडेकरांनीं क्रांतिकारकाच्या नवनिर्मिति या स्थायिभावाला उपकारक, प्रेरक व प्रभुत्वाखालीं वावरणाऱ्या असें म्हटलें आहे. अशा भावनांनाच व्यभिचारी भाव अशी संज्ञा आहे. (मात्र ही संज्ञा त्यांनीं वापरलेली नाहीं.) त्यांच्या त्या भावना पुढील होत: आत्मप्रौढि,







उदात्त व सात्त्विक वीरभावना, दलितांबद्दलची करुणा, अन्यायाच्या प्रतिकाराची वृत्ति, विश्वकल्याण-बुद्धींत परिणत होणारी परमकारुणिक वृत्ति, वैषम्य-नैर्घृण्यप्रतिकाराची युयुत्सावृत्ति, योग्याची शान्ति, भक्ताचें विश्वप्रेम, कर्मयोग्याची वीर-वृत्ति व निर्मम, निरहंकारी व व्यापक विश्वात्मभावना. आदर्श क्रांतिकारकाची मनोघटना व त्याच्या नवसमाज-निर्मितीची हेतुसिद्धि यां दृष्टीनें वरील भावनांचा उल्लेख अत्यंत उचित आहे. पण केशवसुतांचें क्रांतिकाव्य वाचीत असतां 'नवनिर्मितीच्या आनं-दा'ला ह्या भावना खरोखर पोषक, प्रेरक व गौण होतात कीं काय हा प्रश्नच विचार करण्यासारखा आहे.

### केशवसुतांच्या क्रांतिकाव्यांतील रस

आतां केशवसुती क्रांतिकाव्यच प्रत्यक्ष नजरे-समोर धरून काय होतें तें पाहूं.

क्रान्तिवादी केशवसुतांचें अन्तःकरण ज्यांमध्यें प्रतीत होतें अशा प्रमुख कविता जास्तींत जास्त आठ-दहा आहेत. त्या वाचल्यास वाचकांच्या मना-वर जास्त परिणाम कोणत्या रसाचा होत असला तर तो वीररसाचा. मूर्ति फोडणारे, द्वाड, आडदांड, लुटारू (**मूर्तिभंजन**), 'हरहर महादेव!' ही समरगर्जना करून बंडाचा झेंडा उभारणारे (**स्फूर्ति**), शान्तीचें साम्राज्य स्थापूं पहाणारे, नव्या दमाचे शूर शिपाई (**नवा शिपाई**), संसाराला समर गणून व तेजस्वी कवितेचें निशाण हातीं धरून योध्दयांना प्राणार्पणाची प्रेरणा देणारे सेनानायक (**निशाणाची प्रशंसा**), ढोंगी, आळशी व षंढ लोकांशीं वैर धरून त्यांवर त्वेषानें कठिण शब्दांची धोंडेफेक कर-णारे लढवय्ये (**गोफण केली छान**), उत्साह टिकवून मनगटांतल्या साऱ्या जोरानें बरचीचा अचुक घाव मारण्यास लोकांना सांगणारे युद्धकुशल (**उत्ते-जनाचे दोन शब्द**), सत्य, शील व नवें ज्ञान यांच्या योगानें जग उलथण्याची विद्यार्थ्यांना प्रेरणा देणारे संग्रामगुरू (**विद्यार्थ्यांप्रत**), आणि सम-तेचा ध्वज उंच धरून दंभावर हल्ला करण्यासाठीं व नीतीची द्वाही फिरविण्यासाठीं शूराच्या अंगीं 'तुतारी'च्या भेदक फुंकीनें नवी वीरश्री चढविणारे रणधुरंधर (**तुतारी**), या इतक्या रूपांनीं क्रान्तीच्या रणांगणावर वीराच्या पवित्र्यांत ठाण मांडून उभे असलेले केशवसुत वाचकांस प्रतीत होतात. आणि त्यांच्याहि मनांत तीच वीराची भावना संचरते व इतर भाव तिला केवळ पोषक होतात.

अर्थात् हा प्रत्यक्ष युद्धवीररस नव्हे. वरील काव्या-मध्यें केशवसुतांनीं निर्माण केलेली जी क्रांतिकारक व्यक्ति तिचे आलंबनविभाव समाजक्रांतीला विरोध करणारे कल्पनागम्य प्रतिगामी लोक आहेत. रूढि-वादी आणि प्रतिगामी लोकांच्या उक्ती आणि कृती हे येथील उद्दीपनविभाव होत. भुंवया वांकड्या होणें, डोळे लाल होणें, आवाज चढणें, छातीस हात लावणें, अस्तन्या मागें सारणें व सर्वांग थरथरूं लागणें हे येथील अनुभाव होत. सात्त्विक आत्मप्रौढि किंवा अन्याय सहन न करणारी कोपाची भावना म्हणजेच अमर्ष हा येथील स्थायी भाव आहे. जुन्या रसव्यवस्थेंत वीर-रसाचा स्थायी भाव उत्साह असा देतात. तोहि कोणास मान्य असल्यास स्थायी भाव म्हणून तो येथें समजावा. वरील स्थायिभावाला पोषक व गौण दलितांबद्दलची करुणा, व्यापक बंधुप्रेम वगैरे येथील व्यभिचारी भाव होत. 'स्फूर्ति' व 'नवा शिपाई' या दोन कवितांतील कांहीं ओळी जावडेकरांनीं आपल्या लेखांत उद्धृत केल्या आहेत. तेथील उदात्त भावना सुद्धां वीरभावनेला पोषकच आहेत, कारण "अशा अशा स्फूर्तीनें युक्त व अशा अशा उदात्त तत्त्वशस्त्रांनीं सज्ज असलेल्या मला—नव्या दमाच्या शिपायाला—कोण वठणीला आणूं शकतो तें मी पाहें." हीच झुंजार आत्मप्रौढीची भावना अखेर त्यांत मुख्यत्वेंकरून प्रतीत होते. नवनिर्मिति येथें भावनारूपानें स्पष्ट प्रतीत होत नाहीं. याचें कारण ती क्रांतीच्या हेतुस्थानीं आहे. त्या अर्थानें ती प्रेरक आहे. पण कार्याचा हेतु किंवा निश्चय हे ज्ञानात्मक घटक असल्यानें ते भावनारूप धारण करीत नाहींत. कोणतेंहि कार्य सिद्ध होत आलें किंवा सिद्ध झालें म्हणजे आनंदच होतो. आईला मूल, प्रियेला वल्लभ, वीराला प्रतिवीर, भक्ताला देव व विनोदी माणसाला विनोदविषय भेटला म्हणजे आनंदच होतो; म्हणून कोणी वरील ठिकाणीं





अनुक्रमणिका

आनंदरा मानीत नाहीं. वात्सल्य, शृंगार, वीर, भक्ति व हास्य हेच रस तेथें मानतात. क्रांतिरसाबाबतहि तेंच आहे. क्रांति ही एक व्यापक घटना असल्यामुळें तिची अशी स्वतंत्र भावना नाहीं. प्रसंगपरत्वें ज्या ज्या भावना उत्पन्न होतील त्याच तिच्या भावना व त्यांचे जे रस होतील तेच तिचे रस.

## क्रांतिरस हें नांव असिद्ध

'क्रांतिरस' हें नांव ऐकल्याबरोबर पुष्कळांस तें अनुचित वाटलें; याचें कारण एखाद्या रसाचा स्थायिभाव व तो रस यांमधील जो परस्परसंबंध इतर रूढ रसांत दिसतो तो या रसांत नाहीं. रूढ रस-व्यवस्थेतील रसांचीं नांवें व त्यांचे स्थायिभाव यांच्या-मध्यें एक जागृत करणारा व दुसरा जागृत होणारा, एक आश्रय व दुसरा त्याच्या आश्रयानें राहणारा, किंवा दोघेही एकाच नांवारूपाचे अशा तीन प्रकारच्या संबंधांपैकीं कोणता तरी एक संबंध असतो. म्हणून तीं रसनामें उचित व सार्थ वाटतात. क्रांति अनेक भावना जागृत करीत असल्यानें व ती अनेक स्थायी भावांचा आश्रयाहि होत असल्यानें तिचा असा एक निश्चित स्थायिभाव नाहीं. समाजनिर्मिति किंवा समाजानिर्मितीची भावना हा स्थायिभावच नसल्यानें क्रांतिरस हें नांव सिद्ध होत नाहीं.

याप्रमाणें नव्या व स्वतंत्र रसाच्या स्थापनेला ज्या चार गोष्टींची सिद्धता करावी लागते त्यांपैकीं क्रांतिकाव्यनिर्देश एवढी गोष्ट सोडून उरलेल्यांपैकीं एकाहि गोष्टीची सिद्धता जावडेकरांस दाखवतां आलेली नाहीं. केशवसुतांच्या काव्यांत वीररस आहे, इतर कांहीं क्रांतिकाव्यांमध्यें तेथील वर्णनानुसार करुण, भयानक, अद्भुत शांत इत्यादि रस असूं शकतील. समाजाच्या मोठ्या उलाढालींत क्रांति ही जशी एक घटना आहे तशाच इतरहि अनेक आहेत. प्रतिक्रांति, पुनरुज्जीवनप्रवृत्ति–( revival ), प्रवृत्ति, निवृत्ति किंवा प्रवृत्ति-निवृत्तिसमुच्चय, पुरोगामित्व इत्यादी घटना किंवा प्रवृत्ती कांहीं कवींच्या काव्याला प्रेरक झाल्या तर तितके रस मानावे लागतील व प्रत्येक रसाचा आभिमानी 'माझाच खरा योग्य रस व दुसऱ्याचा रसाभास' असें म्हणूं लागेल. म्हणून रसनामकरणाची ही पद्धतीच सोडली पाहिजे. सदर क्रांतिरसविवेचनाच्या निमित्तानें आत्मानात्मविचार व मानसशास्त्र यांच्या कक्षांबद्दल कांहीं विचार आचार्य जावडेकरांनीं प्रगट केले आहेत. पण निदान केशवसुतांच्या काव्यविवेचनांत तरी त्यांची चर्चा अप्रस्तुत वाटल्यानें तो मुद्दा तूर्त तसाच राहूं देणें इष्ट होय.

## स्वतंत्र क्रान्तिरस आवश्यक नाहीं

शेवटीं, येवढें मात्र स्पष्टपणें नमूद केलें पाहिजे कीं, क्रांति नांवाचा एक नवा व स्वतंत्र रस जरी सिद्ध होत नसला तरी क्रांतीचें तत्त्वज्ञान किंवा क्रांतिकारकाची आदर्श मनोवृत्ति याबद्दलच्या सदर लेखांतील जावडेकरांच्या विचारांना कोठल्याहि प्रकारचा कमीपणा येत नाहीं. तसेच क्रांतिरस हें नांव एका विशिष्ट भावनेला स्वतंत्रपणें योजतां आलें नाहीं म्हणून क्रांतीमुळें उत्पन्न होणाऱ्या किंवा क्रांतीला चालना देणाऱ्या अनेक उत्कट व उन्नीत भावनांना निरनिराळें रसत्व देण्यास संस्कृत साहित्य-शास्त्र नाखूष आहे किंवा असमर्थ आहे असाहि त्याचा अर्थ होत नाहीं. क्रांतिचक्र सुरूं होऊन जेव्हां अनेक बांके प्रसंग उत्पन्न होतात, त्यावेळीं क्रांतिकारकांच्या उदात्त उक्तींतून आणि कृतींतून अनेक उत्कट भावना प्रकटतात. अशा भावनात्मक प्रसंगांवर काव्यें झालीं तर त्या त्या भावनानुरोधानें वीर, करुण, अद्भुत, वत्सल, शांत, भक्ति, भयानक रौद्र असे रस मूर्तिमंत उभे राहून रसिकाच्या काव्यानंदाला भरतें आणतील. केवळ क्रांतिनिर्मितीच्या निमित्तानें झालेल्या किंवा तिला चालना देणाऱ्या भावनांचें एक निराळें जुडगें बांधून त्याला स्वतंत्र क्रांतिरस हें नांव देणें आवश्यक वाटत नाहीं व याच भावना क्रांतीसारख्या इतर घटनेंतहि उत्पन्न होणाऱ्या असल्यानें तसें करणें व्यर्थहि होय. भावना जागृत करणारे प्रसंग बदलले तरी जागृत होणाऱ्या भावना शाश्वत आहेत. मानवी मनांतील भावनांची वर्णमाला तीच आहे. तिच्यांतील त्याच वर्णांच्या भिन्न भिन्न रचनांनीं प्रसंगानुरोधानें आपण नवीन अर्थांचे वाचक भावना शब्द बनवीत असतों, एवढेंच काय तें.

प्रा. य. र. आगाशे

# स्वतंत्र 'क्रांतिरस' कीं 'क्रांतिवीर'?

आचार्य जावडेकर यांनीं जूनच्या 'नवभारतां'-तील "काव्यानंद आणि क्रांतिरस" या आपल्या लेखांत क्रांतिरस हा एक स्वतंत्र रस मानण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे. व जुन्या साहित्यशास्त्राच्या पद्धतीनें त्याचा स्थायी भाव कोणता, विभाव, अनुभाव, व्यभिचारी भाव कोणते हें दाखवून त्या रसाला शास्त्रीय प्रतिष्ठा देतां येते हें दाखविलें आहे. स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या तत्त्वांना मराठी काव्यांत नव्यानें पुरस्कार करणारीं केशवसुतांचीं तुतारी, नवा शिपाई, स्फूर्ति, हीं काव्यें क्रांतिरसाचा परिपोष करणारीं आहेत. देव कोण आणि दानव कोण यांतील परंपरेला तिरस्कृत करणारा विवेक उच्चरवानें सांगण्यांत केशवसुतांचें क्रांतिकारकत्व दिसून येतें. केशवसुतांना राजस व तामस अशी सनातनी पद्धतीची वीरवृत्ति अभिप्रेत नव्हती; तर सत्यनिष्ठा, न्याय, समता, बंधुता, प्रेम इत्यादि सद्वृत्तींना साक्ष ठेवून समाजाची पुनर्घटना करण्यांत दिसून येणारी मानासिक धैर्याची व उदारतेची अभिनव वीरवृत्ति त्यांना पुरस्कृत करावयाची होती. विश्वात्मवृत्तींतून जगाकडे पाहणारी, मूर्तिभंजनाप्रमाणें अभिनवनिर्मितीचा विक्रम करणारी अशी नवसमाजसृष्टीच्या निर्मितीची भावना हाच या नूतन क्रांतिरसाचा स्थायिभाव मानावा असें आचार्य जावडेकरांचें म्हणणें आहे. समाजांत चालू असलेला नव्याजुन्यांचा संघर्ष हा क्रांतिरसाचा आलंबनविभाव, विश्वात्मभाव, समाजांतील विषमता, अन्याय, निष्ठुरता इत्यादिकांचा प्रतिकार करणारी युयुत्सावृत्ति आणि सर्वांच्या कल्याणाविषयीं प्रवृत्त होणारी परमकारुणिक वृत्ति याही भावना पूर्वोक्त स्थायी भावाला पोषक आहेत. या सर्वांमध्यें समाजाच्या नवनिर्मितीची भावना प्रमुख असल्यामुळें तिलाच स्थायी भाव मानावें असें आचार्यांचें म्हणणें आहे.

## नवनिर्मितीच्या प्रवृत्तींचें संमिश्र स्वरूप

प्राचीन साहित्यशास्त्रांत प्रथम आठ, नंतर नऊ रस मानले असून वत्सल, प्रेयान्, भक्ति इत्यादिकांच्या समावेशामुळें ती संख्या फुगत गेली आहे हें स्पष्ट आहे. कोणत्या भावना रसपदवीला योग्य आहेत याचा स्वतंत्रपणें विचार केला असतां असें दिसून येईल कीं, मनुष्याच्या जीवनांत ज्यांचें बाल्य-तारुण्यादि कोणत्या तरी अवस्थेंत प्रभुत्व आणि व्यापित्व दिसून येतें, ज्यांमुळें मानवी जीवनाचा चित्रपट अत्यंत आकर्षक होतो, व अशा भावनासुंदर जीवनाचें स्वाभाविकपणें ललितकला आणि ललित-वाङ्मय यांच्या रूपानें ग्रथन होतें, त्या भावना रसपदवीला योग्य होतात. आस्वाद्यता, प्राथमिकत्व, इत्यादि विशेष त्यांच्या ठिकाणीं असणें किंवा त्यांना समुचित विषय मिळणें आणि त्या एक प्रकारें उदात्तरूपांत प्रकट होणें, या सर्व गोष्टी वर सांगितलेल्या प्रमेयांतूनच निघणाऱ्या आहेत. तेव्हां कांहीं एक तत्त्वास अनुसरून उत्कट होणारी नवसमाजनिर्मितीची भावना जर उत्कटपणें जीवनाला व्यापून राहणारी असेल व तीमुळें मानवी चारित्र्याचा अभिनव आविष्कार होत असेल तर तिलाही रसपदवीचा हक्क सांगतां येईल. मानवी जीवन सारखें बदलत आहे. भौतिक संशोधन आणि सुधारणा, जिज्ञासादि मानवी प्रवृत्तींचा विश्वविशाल संचार, निरनिराळ्या मनःशक्तींचा अधिकाधिक गुंतागुंतीचा व्यापार, नवे अनुभव, नवीं ध्येयें, नवे व्यवहार यांनीं मानवी जीवनाला वैचित्र्य आणि विशालत्व येत आहे. तेव्हां त्या त्या युगमानाला

अनुसरून एखादा अभिनव मिश्रभावनासंघ नांवा-रूपास येऊन मानवाला कार्यप्रवृत्त करीत असेल तर त्या स्थायी भावाचा नवीन म्हणून अनादर करण्याचें कारण नाहीं. नवनिर्मितीची सहज प्रवृत्ति ही मानसशास्त्रज्ञांनीं मूलभूत प्रवृत्तींमध्यें मानलेलीच आहे. तिच्यामागें समता, बंधुता, विश्वात्मभाव, विषमतेचा प्रतिकार करण्याची युयुत्सा इत्यादी वृत्ती जोडीनें कार्यव्याप्त आहेत, इतकेंच या नूतन प्रवृत्तीचें संमिश्र स्वरूप आहे.

## गौरवाचा दोष टाळतां येईल

साहित्यशास्त्राची बैठक क्रांतिरसाला देण्यांत तत्त्वतः विरोध असण्याचें कारण नाहीं. फक्त व्यवहार-सौकर्याच्या दृष्टीनें शास्त्रीय विवेचनांत वृथा-गौरवाचा दोष येऊं नये म्हणून एक सूचना करावीशी वाटते. क्रांतीची भावना म्हणजे एक प्रकारची वीरवृत्तिच आहे. ती परंपरागत राजस वा तामस स्वरूपाची नसून अत्यंत सात्त्विक आणि उदात्त स्वरूपाची, विश्वबंधुत्वाच्या उच्च वृत्तीमुळें कार्यप्रवण होणारी आहे हें लक्षांत आलेंच असेल. तेव्हां तिला आणखी एका प्रमुख रसाची पदवी न देतां, आहे त्याच रस-व्यवस्थेंत तिची सोय कांहीं मर्यादित स्वातंत्र्य देऊन करतां येते कीं नाहीं हें पाहणें आवश्यक आहे. या दृष्टीनें वीररसाचा थोडा विचार करणें प्राप्त आहे. उत्साह हा त्याचा स्थायी भाव बहुतेक साहित्यशास्त्रज्ञांनीं मानला आहे. ती निश्चित भावना नाहीं, सर्व तऱ्हेच्या कार्याला प्रेरक असणारी ती एक शारीर–मानसशक्ति आहे. ती सर्वच सहजप्रवृत्तींत अनुस्यूत असते म्हणून उत्साहा-ऐवजीं अमर्ष हा स्थायी भाव मानावा, अनिष्ट गोष्ट सहन न करण्याची वृत्ति म्हणजे अमर्ष असें डॉ. वाटवे यांनीं प्रतिपादिलें आहे ( रसविमर्श, पृ. १२६). येथें त्या बारकाव्यामध्यें न शिरतां क्रांतिरसाला वीररसाचा पोटभेद मानतां येईल कीं नाहीं इतकेंच पाहावयाचें आहे. प्रतिकार करण्यांत दिसून येणारा उत्साह एकच स्वरूपाचा नसतो. तो भिन्न भिन्न प्रकारें दिसून येतो. त्यामुळेंच अशा उत्साहावर आधारलेल्या वीररसाचे युद्धवीर, दयावीर, दानवीर असे तीन फांटे फुटले आहेत. भक्तिवीर तुकारामांच्या अभंगांत प्रत्ययास येतो. रसविमर्शामध्यें यज्ञशूर, क्षमाशूर, बुद्धिशूर, गुरुशुश्रुषाशूर, अतिथिपूजनशूर इत्यादिकांचाही निर्देश केलेला आहे. अशी थोडी अनवस्था असली तरी वीरतेचें स्थान जीवनांत कायम आहे. तिचें अधिष्ठान डॉ. वाटवे यांच्या सूचनेप्रमाणें अमर्ष हें मानावें इतकेंच. विश्वात्मवृत्तीनें, समता, बंधुता, स्वातंत्र्य यांवर दृष्टि अचल ठेवून ज्याला समाजरचनेंत क्रांति घडवून आणावयाची आहे, त्याला समाजांतील अन्याय, विषमता, अमानुषतेची वृत्ति या गोष्टी दुःसह वाटतील यांत नवल नाहीं. तेव्हां हीन गोष्टीचा प्रतिकार वा नाश करून नवी रचना करणें हेंच क्रांतिवीराचें ध्येय असतें. अशी क्रांतिभावना उत्कटपणें ज्या मूलभूत अमर्षाच्या आश्रयानें प्रकट होते ती मुख्यत्वानें वीरतेचा परिपोष करते असें मानणें योग्य होईल. आतां उपभेदास अनुसरून नांव देण्याची प्रवृत्ति ही दयावीर, दानवीर, युद्धवीर यांत दिसून येते हें वर सांगितलेंच आहे. ती पूर्वीप्रमाणें आतांही प्रकट झाल्यास नवल नाहीं. तिला अनुसरून सत्य, समता, बंधुता, विश्वात्मता इत्यादि गुणांनीं विशिष्ट अशा क्रांतिभावनेला–नवनिर्मितीच्या भावनेला–अमर्ष भावनेच्या सदरांत बसवून ती मुख्यतः वीररसाचा आविष्कार करते असें मानावें. तिला निराळा स्थायीभाव कल्पून **क्रांतिरस** हा एक स्वतंत्र रस मानण्यापेक्षां 'क्रांतिवीर' वीररसाचाच प्रकार मानणें योग्य होईल. दयावीर, दानवीर यांच्या जोडीनें क्रांतिवीर हा वीररसाचा एक प्रकार समर्पकपणें दाखवितां येईल आणि शास्त्रीय रसव्यवस्थेंत गौरवाचा दोष टाळतां येईल असें वाटतें.

---

श्री. ना. ग. जोशी

# "क्रांतिरसा"च्या निमित्तानें

## मुक्त साहित्याला शास्त्राचें कुंपण!

साहित्याचें जग हें नित्य विकासशील आहे. जे नित्यनूतन विचार आणि भाव व्यक्तिमनांत तरळत असतात त्यांचें विशाल भूमिकेवरून सामान्यीकरण होऊन ते साहित्यरूपानें प्रकट होतात अशा तऱ्हेनें साहित्याची प्रकृति स्वरूपतः अन्तर्निष्ठ आणि सामान्यरूप आहे. आर्ष महाकाव्यें ह्या साहित्याचें सर्वश्रेष्ठ उदाहरण होय. त्यावेळीं साहित्यशास्त्र नव्हतें, पण उत्तम साहित्य निर्माण होत होतें आणि समाजजीवनांतील गोष्टींचें व्यक्तिमनांतील संवेदनांच्या द्वारां जें प्रकटन झालें तें तें होतें. साहित्याची सुरुवात ही अशा तऱ्हेची आहे.

त्यानंतर त्या साहित्याच्या निर्मितीची प्रक्रिया तपासली गेली. तींतून तर्काधिष्ठित निर्णय घेण्यात येऊं लागले. मनोधर्मांचें स्थूल पृथक्करण करून त्याप्रमाणें भावभावनांचें विभागीकरण झालें व त्यांतून रसशास्त्र प्रकट झालें. साहित्याच्या निसर्गानुगामी निर्मितींत विस्कळितपणा, संकीर्णपणा असतो, तो या संघटनानिष्ठ रसशास्त्राला मान्य झाला नाहीं. त्यानें रसांचे सांचे ठरवून टाकले. बारकि चिरफाड करून साहित्यकाराला निश्चित नियम दाखवून त्याचें स्वातंत्र्य कमी केलें. साहित्य अजूनपर्यंत जें मुक्तभावानें वाढत होतें त्याला हें शास्त्राचें कुंपण घातलें. त्यांतून पुढें वस्तुनिष्ठ, बाह्यलक्षी साहित्याचा प्रचंड विस्तार निर्माण झाला. या तऱ्हेंत बसणारें तेंच खरें साहित्य असा समज दृढ झाला. साहित्याच्या मूळ अनिर्बंध संचाराला रसमर्यादांचे घट्ट अडसर प्रतिबंध करूं लागले. अशा वेळीं निर्माण झालेलें साहित्य तंत्रशुद्ध 'रस'-सिद्ध पण निर्जीव ठोकळेवजा वाटूं लागलें. या दृढ रसव्यवस्थेला मानून अनेक महान् कवींनीं साहित्यनिर्मिति केली हें खरें. पण त्यांत असणारा जिवंतपणा या घट्ट रसव्यवस्थेच्या सांच्यांत आहे कीं त्यापलीकडील कांहीं मूलभूत सर्वकालीन श्रेष्ठतेंत आहे हें पाहूं गेल्यास रसव्यवस्थेचें दुय्यम महत्त्व स्पष्ट होईल.

## पूर्वींच्या रसव्यवस्थेच्या वेळचा समाज

पण याच दृढ सांचेबाज रसव्यवस्थेच्या वाटेला न जातां एक मोठा वर्ग साहित्य निर्माण करीत होता. पंडितांनीं त्या साहित्याला साहित्य म्हणून मानावयाचें नाकारलें, अजूनहि नाकारीत आहेत. संतांचें भक्तिकाव्य आणि लोकांचें लोककाव्य या रसव्यवस्थेला न जुमानतां वाढत होतें. संतांनीं रसव्यवस्था डावलली असें नाहीं. पण त्यांतील दृढतेची पर्वा केली नाहीं. लोकसाहित्यांतहि शास्त्राचा मागोवा आहेच, पण तेथें भावप्रकटनाचें स्वातंत्र्य अबाधित ठेवलें आहे. परंतु पंडितांना या भक्तिप्रधान काव्याकडे पुढें दुर्लक्ष करणें अशक्य झालें. त्यांनीं त्याला रसव्यवस्थेंत जागा करून दिली. अंतर्निष्ठ आविष्कारानें निर्माण झालेल्या या जिवंत साहित्यकृतींना बाह्यनिष्ठ साहित्याला योग्य अशा रसव्यवस्थेंत डांबून टाकण्याचा प्रयत्न झाला. 'देवताविषयक रति' असलेला भक्तिरस पंडितांत मान्यता पावला. लोकसाहित्यालाहि पुढें बरीचशी मान्यता मिळाली.

आजच्या काळांत तर काव्य बहुशी अन्तर्निष्ठ आहे. भक्तिमार्गी कवितांत जी आत्मनिष्ठता होती तिचा वारसा आजच्या कवितेला आहेच. पण आजच्या जगांत जी एक संमिश्रता आहे ती कवितेच्या निर्मितीचा एक मोठा भाग आहे. जीवनाच्या

ज्या प्रधान वृत्ती आहेत, त्या कवींच्या कृतींत विशालतेनें आविष्कृत होत आहेत. पण कवीच्या हृदयस्थ रसायनानें त्याला जिवंत केल्यामुळें तें साहित्य वैयक्तिक न होतांहि अत्यंत अंतर्निष्ठ झालेलें असतें. एकंदर जीवनांतच आमूलाग्र फरक झाला आहे. पूर्वीच्या रसव्यवस्थेच्या वेळचा समाज आज राहिला नाहीं. त्या वेळच्याइतकी निश्चितता वृत्तींत उरली नाहीं. जें सहजभावानें व्यक्त होत जाईल तें व जें जीवनांतील सर्व अनुभवांच्या रूपानें अनुभावकाच्या दृष्टिकोनांतून निर्माण होईल तें आजचा खरा कवि निर्माण करीत असतो. त्यामुळें आजची काव्यांतर्गत विशाल प्रेमभावना दृढ शृंगाररसांत बसूं शकत नाहीं; जीवनांतील झुंजार वृत्ति पुराण्या शौर्यानें मापली जाऊं शकत नसल्यानें ती वीररसांत सामावली जात नाहीं; आजची करुणा मानव्यविषयक विश्वात्मभावाची असल्यामुळें अश्रू ढाळून व्यक्त होणाऱ्या करुणरसाची दृढ चौकट तिला आपलीशी म्हणूं शकत नाहीं; प्रपंचविषयक निर्वेद हा आजच्या शांतीची बैठक नसून तेथें मानवाचें कल्याण अभिप्रेत असल्यामुळें ' शांतोऽपि नवमो रसः ' सुद्धां थिटा पडतो! ही एकंदर रसव्यवस्थाच आजच्या काव्यप्रकृतीला न मानवणारी आहे. मग त्या रसव्यवस्थेंत आणखी एकाद्या ' प्रक्षोभ ' किंवा ' क्रांति ' नामक रसाची भर घालण्यांत काय स्वारस्य आहे !

### रसिक आणि राज्यनीतिशास्त्रज्ञ यांचें मिश्रण !

आचार्य जावडेकरांच्या भूमिकेंत या दुहेरी स्वरूपाचें विचित्र मिश्रण आहे. जीवनांत वाढत जाणारी व्यापकता त्यांना जाणवते. साहित्य—विशेषतः काव्य—हें तर जास्तींत जास्त व्यापक व समावेशक वृत्तींचें द्योतक असतें. तें जास्तींत जास्त सामान्यीकरणाचें कार्य असतें. तेथें वर निर्दिष्ट केलेल्या रसव्यवस्थेसारख्या एकाद्या दृढ, विशिष्ट रसाची चौकट कशी समाधानकारक होईल ! शिवाय पूर्वीच्या रसव्यवस्थेसारखी स्थायी भाव, आलंबनविभाव, अनुभाव, सहचारी भाव वगैरे घटपटादि खटपटींत पडून एखादा स्वतंत्र विशिष्ट रस निर्माण करावा असा त्यांचा प्रयत्न दिसत नाहीं. कारण जीवनांतील तीन प्रधान व विश्वात्म भाववृत्तींचें अस्तित्व मानून त्याप्रमाणें आपली क्रांतिरसाची उभारणी त्यांनीं केली आहे. शांति, प्रीति व क्रांति या त्या वृत्ती होत. या क्रांतीच्या वृत्तीची मूळ भूमिका जागतिक शांतीचीहि असूं शकेल असेंहि त्यांचें मत दिसतें. केशवसुतांच्या क्रांतिकाव्यामागची भूमिका स्पष्ट करतांना ते लिहितात :

" एक जग उलथून टाकण्याची, नवें जग निर्माण करण्याची, पृथ्वीवर स्वर्ग अवतरविण्याची आणि सर्व जगांत **शांतीचें** साम्राज्य स्थापन करण्याची शक्ति मानवी अंतःकरणांत जागृत करतां येईल...असा विश्वास त्यांना वाटूं लागला."

—' नवभारत ', जुलै १९४९, पान ८०४

या आत्मविश्वासानें केशवसुतांनीं प्रतिभेची आराधना केली व क्रांतिरसानें रसरसलेलें काव्य निर्माण झालें. म्हणजे या क्रांति'रसा'मागची भूमिका फार विशाल आहे व तेंच योग्य आहे. पण यानंतर जावडेकरांमधील मूलदर्शी रसिक बाजूला सरतो आणि राज्यनीतिशास्त्रज्ञ बाहेर डोकावतो. त्यांनीं वीरवृत्ति व क्रांतिवृत्ति यांतील फरक दाखवितांना नैतिक मूल्यांची—खरें म्हणजे राजनैतिक मूल्यांची—परिभाषा वापरली आहे. हें विशेषीकरण रसापकर्षक तर आहेच पण मूळच्या विशाल भूमिकेशीं विसंगत आहे. एक तर क्रांतिकारक–प्रतिक्रांतिकारक असे वर्ग ' रस 'व्यवस्थेंत बरोबर नाहींत. त्यांत मनोभावसहज भूमिका सहजप्राप्त असेल. पण राजनैतिक समानमूल्यांची भूमिका कृत्रिम आहे; एवढेंच नव्हे, तर ती कवीच्या स्वाभाविक प्रवृत्तीला न मानवणारी आहे. सर्व काव्यविश्वच सत्याच्या आधारानें चालतें, चाललें पाहिजे. त्यानें मानवी कल्याणाचा आदर्श पुढें ठेवला पाहिजे हें भूमिकेच्या दृष्टीनें मान्य केल्यावर मग आणखी अ–कल्याणकर प्रतिक्रांतिकारी मूल्यें विचारांत घ्यायचें कारण नाहीं. कारण तें कवीच्या खऱ्या जीवनदर्शी वृत्तीला शोभणारें नाहीं. एक तर, तें वर निर्देशिलेल्या ' शांति 'मूलक काव्यप्रतिभेशीं विसंगत होईल आणि दुसरें म्हणजे, कोणाहि राजनैतिक पुढाऱ्याला याबाबत मत द्यायचा अधिकार प्राप्त होईल. मग जो जास्त जहाल तो पहिल्याला प्रतिक्रांतिकारक ठरवील आणि शेवटीं केशवसुत

हे देखील सरंजामी युगाचे प्रतिक्रांतिकारक प्रतिनिधि ठरतील. ही व्यवस्था केवळ उद्वेगकारक ठरणार नाहीं, तर ती काव्यवृत्तीलाच मारक ठरेल. तेव्हां अशा तऱ्हेनें ज्या सहज प्रवृत्ती विशाल भूमिकेच्या आहेत, त्यांना समाजधर्मीय मूल्यांनीं जखडून न टाकतां अनिर्बंधपणें वावरूं देणें अंतिम कल्याणाच्या दृष्टीनें योग्य होय.

## प्रक्षोभरस व 'क्रांतिरस' हे सोदर

क्रांतिरसाच्या स्थायी भावाची निश्चिति करणें मानसशास्त्रीय दृष्टीनेंहि कठीण आहे. एकतर तो स्थायी भाव मनाची एक 'स्थायी' वृत्ति पाहिजे, तो एक सार्वत्रिक व सार्वकालीन अनुभव पाहिजे. अशा 'भावा'साठीं आचार्य जावडेकरांनीं प्रतिपादिलेली अभावात्मक व निषेधात्मक गोष्ट कशी योग्य ठरेल? मूळ परिस्थितीविरुद्ध बंडखोरीची क्षोभवृत्ति जागृत होऊं शकेल. पण त्या जागृत भावनेची व्याप्ति मोठी असणार. तिला ती प्रतिक्रांतिकारक 'नसावी' अशी मर्यादा घालून निश्चित करणें ही प्रक्रिया नकारात्मक आणि वैचारिक—बौद्धिक आहे. ती अतिशय ससंज्ञ आणि वस्तुनिष्ट अवस्थेची द्योतक आहे. आत्म्याचा संबंध वगैरे दूरान्वय होय; कारण व्यवहारतः राजनैतिक क्रांतीसाठींच त्याचा उपयोग होणार. तेव्हां अशा प्रतिक्रियेच्या मर्यादा दाखविणाऱ्या मूलतः बौद्धिक प्रक्रियेला 'स्थायी भावा'चें स्थान देणें अयुक्तिक वाटतें. तो केवळ पूर्वपक्ष मांडणाऱ्या साहित्यशास्त्र्याचा वैयक्तिक कल असेल, त्याला स्वतंत्र रसाच्या अधिष्ठानाचें—स्थायी भावाचें—स्वरूप देतां येणार नाहीं.

शिवाय आणखी एक मुद्दा आहे. कविवर्य अनिल यांनीं यापूर्वीच एका 'प्रक्षोभ'—नामक रसाची प्रस्थापना करण्याचा प्रयत्न केलेला आहे. अत्यंत सूक्ष्मदर्शी व तरल प्रतिभेच्या या कवीनें आधुनिक काव्यामागची क्षोभवृत्ति अचूक हेरली. पण मग प्रयत्न मात्र जीर्ण रसव्यवस्थेंत त्या प्रक्षोभाला ठाकून ठोकून बसविण्याचा झाला. त्यांनीं तर त्यांची सर्व अंगोपांगें निश्चित केलीं आणि जी वृत्ति स्वभावतः अनिर्बंध व प्रसरणशील आहे त्या वृत्तीला रसाच्या चौकटींत जखडली. तो प्रयत्न जुन्यांना मान्य होणें शक्यच नाहीं. पण नवकाव्याची प्रवृत्ति अचूक कळलेल्या नवीनांनाहि तो प्रयत्न जखडणुकीचा वाटणारच. जेथें खरोखरच जुन्या दृढ सांच्याचाच उपयोग नाहीं, तिथें त्यांत आणखी नवीन रस बसविण्यांत काय हंशील! आजचा कोणताहि कवि त्या जुन्या अंगप्रत्यंगांनीं युक्त अशा रसव्यवस्थेला धरून काव्य निर्माण करीत नाहीं. जास्तींत जास्त मोकळ्या विशाल वृत्तींचें तें आविष्करण असतें. त्यांत अनेक वृत्तींची मिळवणी असते. अमुक प्रधान, तमुक गौण हा प्रश्नच नाहीं. अनुभवच संकलनात्मक, संमिश्र स्वरूपाचे असतात. जीवनाच्या समग्र अनुभवांशीं जें साधर्म्य सांगणार तें काव्य विशेषीकरणाच्या प्रयत्नांत कसा आनंद मानूं शकेल?

हा वर उल्लेखिलेला 'प्रक्षोभरस' आणि जावडेकर-प्रणीत 'क्रांतिरस' मूलतः सोदर आहेत. त्यांची मनोवृत्तिमूलक भूमिका समान आहे. जीर्णाशीं नवीनाचा संघर्ष प्रक्षोभकारकच असतो व त्यांतूनच क्रांति निर्माण होते. तेव्हां या नवीन रसाला असलेलें सामाजिक मूल्यांचें कुंपण काढून मानवी वृत्तीची सहज सीमा त्याला असावी.

खरें म्हणजे आजच्या नवकवितेच्या टीकेंतच आपण याचें प्रत्यंतर पाहूं शकतों. त्यांतील काव्याचें समालोचन जुन्या रसांच्या चौकटींत मांडून करतां येत नाहीं. परिभाषा 'भावभावना' अशा शब्दांची वापरावी लागते. अशा स्थितींत 'क्षोभवृत्ति' किंवा 'क्रांतिवृत्ति' हा शब्द चांगला अर्थव्यंजक होईल. पण त्याला जुन्या रसचौकटींत बसवितांच अनेक सहचारी गोष्टी त्याला चिकटून तो शब्द दृढ, संकुचित बनेल. लवचिकपणा जाऊन त्यांतील अर्थव्यंजकता कमी होईल.

## रसव्यवस्थेचें कुंपण घालणें प्रतिक्रांतिकारक!

ज्यांना सांस्कृतिक व सामाजिक व्यवस्थेंत खरी क्रांति पाहिजे आहे अशा वरील विचारवंतांनीं आधुनिक साहित्याच्या मागची भूमिका अचूक हेरल्यावर त्यांनींच त्या विशाल भूमिकेला जुन्या तंत्रांत नेऊन बसविण्याचा प्रयत्न करणें प्रतिक्रांतिकारक ठरणार नाहीं काय? वणव्यासारख्या वाढणाऱ्या प्रक्षोभाला 'कुंपणा'चें काय होय! नवें जग निर्माण करणाऱ्या 'क्रांति'—वृत्तीला जीर्ण यमनियमांचें काय महत्त्व? पण बरोबर अशाच








गंमतीचा प्रकार कविवर्य अनिल व आचार्य जावडेकर या दोन मान्यवर व रसिक विचारवंतांच्या हातून घडत आहे. त्यामुळें त्यांचा मूळ हेतूच पराभूत होऊन नष्ट होतो याकडे लक्ष वेधण्यासाठीं एवढें स्पष्टपणें लिहिलें आहे.

तेव्हां सदा गतिशील व विकासोन्मुख असें विशाल मनोवृत्तीचें वाहन जें साहित्य, त्याला संकुचित रसव्यवस्थेचें कुंपण मानवणार नाहीं. जें स्वभावतः संमिश्र, संकलनात्मक व समावेशक आहे त्याला विभिन्न, विशिष्ट आणि दृढ शास्त्राच्या चौकटींत बसविणें मूलतःच अशास्त्रीय आहे. पंडितांनीं जरी सांचे बनविले तरी ते काव्यनिर्मात्याला महत्त्वाचे वाटणार नाहींत. मग हा व्यर्थ खटाटोप करणाऱ्यांनीं तो करावा खुशाल हवा तर!

## क्रांतिरस नव्हे, प्रक्षोभरस

"तुतारी" ही कविता वाचतांना भाषण 'नवीन समाजसृष्टि' निर्माण करण्याच्या वृत्तीची चर्वणा करून आस्वाद घेत असतों काय, हें पाहिलें पाहिजे. मला वाटतें, त्यावेळीं 'चीड येणें' या सहजप्रवृत्तीवर आधारलेल्या व सहसंवेदनेनें उत्पन्न झालेल्या, 'सहन न करण्याच्या' भावनेचें चर्वण होत असतें. ती भावना साध्या चीड येण्याच्या भावनेसारखी नसते, तिला नवजगत्–रचनेचें उन्नयन असतें, हें खरें; पण चर्वण त्या भावनेचेंच असूं शकतें. त्या भावनेलाच स्थायी भाव मानता येईल. तिला 'अमर्ष' म्हणता येईल. पण त्या शब्दाला साहित्यशास्त्रानें पूर्वींच केलेलीं लक्षणें चिकटलीं आहेत. तीं लक्षणें जुन्या साहित्यशास्त्रांतील उदाहरणांच्या दृष्टीनें योग्य असल्यामुळें, तीं अव्याप्त व अतिव्याप्त करण्यापेक्षा नवीन शब्द रूढ केलेला बरा. ह्या दृष्टीनें मी त्या स्थायीभावाला 'संवेग' हें नांव सुचविलें.

रस हा स्थायी भावाचें परिणत स्वरूप असल्यामुळें त्याला स्थायिभावाच्या अनुषंगानें नांव दिलें पाहिजे. 'क्रांतिरस' हें उपरिनिर्दिष्ट स्थायी भावाचें परिणत स्वरूप दाखविणारें नांव होऊं शकणार नाहीं, असें मला वाटतें. 'क्रांति' हा भावनाप्रकर्ष नाहीं, तर जुनें जाऊन नवें येण्याची घटना आहे. अशा तऱ्हेचें घटनावाचक नांव रसास देणें योग्य होणार नाहीं. शिवाय हा नवीन रस ज्या नवकाव्यांत प्रतीत होतो, त्यांत सर्वदाच क्रांति अभिप्रेत आहे, असेंहि नाहीं. केव्हां निवळ मानवता, जीवनानंद आणि विकास हेहि अभिप्रेत असतात. 'क्रांतिरस' हा शब्द योजल्यानें या नवीन रसाचें स्वरूप संकुचित होण्याचा संभव आहे. म्हणून मी या नवीन रसाला पूर्वोक्त 'संवेग' या स्थायी भावाच्या परिणत स्वरूपाचें नुसता 'क्षोभ' नव्हे तर 'क्षोभप्रकर्ष' या अर्थाचें 'प्रक्षोभ' हें नांव दिलें.

'प्रक्षोभ' हा नवा रस मानल्यानें केशवसुतांपासून तों मर्ढेकरांपर्यंतच्या नवकाव्यांत दिसून येणाऱ्या व पूर्वींच्या रसव्यवस्थेंत न पडणाऱ्या नव्या रसाची सम्यक् उपपत्ति लागूं शकते. आपण मर्ढेकरांच्या 'कांहीं कविता' या संग्रहांतलीं उदाहरणें घेऊं. पारंपरिक व कुंठित साहित्यशास्त्राच्या रससंख्येच्या मर्यादेंत त्यांची चर्चा करणें भाग पडल्यास त्या 'बीभत्स' रसाच्या आहेत, व त्यांचा स्थायी भाव 'जुगुप्सा' म्हणजे किळस आहे, असें म्हणावें लागेल. पण हें त्या काव्याचें अंतरंग न पहाणारें विवेचन होईल. तशी वस्तुस्थितीहि नाहीं. त्या कविता वाचतांना 'जुगुप्सा' या भावनेची चर्वणा होत नाहीं. व 'बीभत्स–रसा'चा आस्वादहि येत नाहीं. तर ज्या आर्थिक घटनांमुळें त्यांत वर्णिलेली स्थिति उत्पन्न होते, तिंजविरुद्ध 'संवेग' हा भाव उसळतो, आणि 'प्रक्षोभ' हाच रस प्रतीत होतो. 'जुगुप्सा' हा भाव व बीभत्स हा रस तेथें संचारी आहे व मुख्य रस जो 'प्रक्षोभ' त्याचा उत्कर्ष करण्यास तो सहायक होतो.

—श्री. आ. रा. देशपांडे, नागपूर

( नभोवाणीवर ऑगस्ट १९४९ मध्यें केलेल्या भाषणांतून ) मौज, ता. २४–८–४९

२३८८८

प्रा. ए. रा. घोंगडे

# हिंदी उद्योगधंदे व संरक्षण

गेल्या एप्रिलमध्यें मध्यवर्ती सरकारनें हिंदी उद्योगधंद्यांना संरक्षण देण्यासंबंधीचे प्रश्नांचा विचार करण्यासाठीं एक कमिशन* (Fiscal Commission) नेमलें. परदेशी मालावरील जकातीबाबत योग्य धोरण आखल्याशिवाय हिंदी उद्योगधंद्यांना संरक्षण व उत्तेजन मिळणार नाहीं हें उघड आहे. असें धोरण आखण्याची आपली तयारी सरकारनें एप्रिल १९४८ च्या उद्योगधंद्यांविषयींच्या जाहीरनाम्यांत दर्शाविली होती. परंतु तें धोरण काय असावें याचा विचार करण्यासाठीं चौकशीमंडळ नेमण्यास बारा महिन्यांचा कालावधि लागला. तरी पण हिंदी उद्योगधंद्यांच्या वाढीकडे सरकारचें लक्ष आतां वेधलें असल्याचा प्रत्यय या कमिशनच्या नेमणुकीवरून आला व त्याबद्दल बऱ्याच लोकांनीं सरकारचें अभिनंदनही केलें.

उद्योगधंद्यांना संरक्षण देण्यासंबंधींचें सध्यांचें धोरण १९२२ सालीं अशाच एका कामिशननें ठरविलें व तेंच धोरण अद्याप अमलांत आहे. त्या वेळचें वातावरण राजकीय व आर्थिक दृष्ट्या आजच्या पेक्षां फारच वेगळें होतें. आज हिंदुस्थान पारतंत्र्यांतून मुक्त झाला आहे. गेल्या युद्धामुळें हिंदी उद्योगधंद्यांवर झालेले परिणाम अद्यापही कांहीं अंशीं कायम आहेत. युद्धकालीं व तदनंतर हिंदी उद्योगधंद्यांना अनायासेंच परकीय मालाच्या चढाओढीपासून संरक्षण मिळालें. यंत्रसामुग्रीच्या अभावीं भरभराट कशी खुंटते याचाही कटु अनुभव पुनः एकदां आला. आतां परकीय मालाशीं टक्कर देण्याचा प्रसंग आला आहे व संरक्षणाची जरूरी भासूं लागली आहे. हें संरक्षण कसें व कोणत्या तत्त्वानुसार द्यावें, हाच प्रश्न मुख्यतः कामिशनपुढें आहे.

१९२२ सालीं अमलांत आलेल्या धोरणास "Policy of Discriminating Protection" असें म्हणतात. या धोरणानुसार गेल्या पंचवीस वर्षांत कांहीं उद्योगधंद्यांना संरक्षण मिळालें खरें; परंतु तें धोरण अनेकदृष्ट्या असमाधानकारकच होतें. तेंच धोरण यापुढेंही चालू ठेवणें स्वतंत्र भारताच्या उद्योगधंद्यांस हितावह होणार नाहीं. त्या धोरणांतील कांहीं दोषांचा विचार करणें जरूर आहे.

(अ) एकतर, या धोरणानुसार संरक्षण मिळविण्यासाठीं जो अर्ज करावयाचा तो प्रत्यक्ष अस्तित्वांत असलेल्या उद्योगधंद्यांबाबतच असला पाहिजे. कांहीं उद्योगधंदे असे असतात कीं, त्यांना आगाऊ संरक्षण मिळाल्याशिवाय ते अस्तित्वांतच येऊं शकत नाहींत. असल्या उद्योगधंद्यांना अर्थातच हें १९२२ सालचें धोरण कांहींच मदत करूं शकत नव्हतें.

(आ) दुसरें म्हणजे, ज्या उद्योगधंद्यांस संरक्षण मिळवावयाचें त्याला कांहीं आवश्यक अशीं साधनें सहजसुलभ असलीं तरच संरक्षण द्यावयाचें, हीही एक अट होती. म्हणजे जरूर तो कच्चा माल या देशांतच मुबलकपणें उपलब्ध पाहिजे व तयार मालास

---

*कामिशनचे सभासद: श्री. व्ही. टी. कृष्णम्माचारी (अध्यक्ष), डॉ. श्री. एन. गांगुली, श्री. बी. एम्. बिर्ला, श्री. अनन्तशयनम् अय्यंगार, चौधरी मुख्तारसिंग, श्री. खंडूभाई देसाई, श्री. अंबालाल साराभाई, श्री. डी. एल्. मुजूमदार, सदस्य व कार्यवाह.








या देशांतच भरपूर मागणी असली पाहिजे. जर या व अशा गोष्टींपैकीं कांहींचा अभाव दिसून आला तर संरक्षण मिळणें शक्य नव्हतें. 'सोडा ॲश' या देशांत पुरेसा नसल्यामुळें कांच कारखान्यांना संरक्षण मिळवितां आलें नाहीं. त्याचप्रमाणें लोकरीचा माल व भारी रासायनिक द्रव्यें (Heavy Chemicals) तयार करणाऱ्या उद्योगधंद्यांनाही संरक्षण मिळालें नाहीं. अशा तऱ्हेची अट इतरत्र असती तर आज जगांत अग्रेसर गणले जाणारे कांहीं उद्योगधंदे अस्तित्वांत येणेंही अशक्य झालें असतें! उदाहरणार्थ, कापूस इंग्लंडांत पिकत नाहीं म्हणून लँकेशायरमध्यें सुती कापडाच्या गिरण्या प्रस्थापित होऊं शकल्या नसत्या, जपानलाहि कापडगिरण्या सुरू करतां आल्या नसत्या व अमेरिकेला रबरी मालाचे कारखाने काढतां आले नसते! तेव्हां ही अट किती अनावश्यक होती हें उघड आहे. कच्चा माल देशांत उपलब्ध नसला तर बाहेरून आणतां येतो. तसेंच तयार मालही परदेशी बाजारपेठांत खपवितां येतो.

(इ) १९२२ सालीं अमलांत आलेल्या धोरणाची आणखी एक अट अशी आहे कीं, ज्या ज्या उद्योगधंद्यांस संरक्षण द्यावयाचें तो योग्य कालमर्यादेनंतर संरक्षण काढून टाकलें तरी स्वतःच्या पायावर उभा राहण्यास समर्थ होईल, असें सिद्ध झालें तरच त्याला संरक्षण द्यावयाचें. औद्योगिक क्षेत्रांत जी अनिश्चितता वावरते ती लक्षांत घेतां ही अटसुद्धां असमाधानकारकच म्हणावी लागते. संरक्षित उद्योगधंद्यांची प्रगति केवळ त्या धंद्यांत गुंतलेल्या घटकांच्या हुशारीवर व कार्यक्षमतेवरच अवलंबून नसते. बाह्य जगांतील वातावरणाचाही त्या प्रगतीवर बऱ्याच अंशीं परिणाम होतो. या वातावरणाचा आगाऊ अंदाज अचूकपणें करणें हें सोपें नाहीं. तेव्हां बऱ्याच उद्योगधंद्यांना ही अट आपण पुरवूं शकूं, असें खात्रीलायक रीत्या पटवून देणें कठीण असे. अर्थातच असे उद्योगधंदे संरक्षणास अपात्र ठरत.

(ई) चालू धोरणानुसार संरक्षण द्यावयाचें कीं नाहीं हें ठरविण्यासाठीं सरकार जकातमंडळां (Tariff Boards) ची नेमणूक करी हीं मंडळें त्यांचेकडे सोपविलेल्या विशिष्ट उद्योगधंद्यांबाबत चौकशी करीत आणि वर दर्शविलेल्या अटींच्या चौकटींत संरक्षण मागणारा धंदा कितपत बसतो याची छाननी करून आपल्या शिफारसी सरकारकडे पाठवीत. वेगवेगळ्या उद्योगधंद्यांबाबत निर्णय वेगवेगळ्या मंडळांनीं घेतल्यामुळें मंडळांचे कामांत व दृष्टिकोनांत एकसूत्रीपणा नसे. शिवाय मंडळानें शिफारस केली कीं त्याचें काम संपे. त्यामुळें संरक्षित उद्योगधंद्यांवर नजर ठेवण्याची जबाबदारी अर्थातच या मंडळांवर नसे.

वरील विवेचनावरून हें स्पष्टपणें दिसून येतें कीं, युद्धपूर्व कालावधींत हिंदी उद्योगधंद्यांची नियोजित पद्धतीनें भरभराट होण्यास १९२२ सालचें धोरण पोषक नव्हतें. शिवाय जकातमंडळांनीं केलेल्या शिफारशी स्वीकारणें अगर नाकारणें सरकारच्या मर्जीवर अवलंबून असे. या बाबतींत निर्णय घेतांना बऱ्याच वेळीं ब्रिटिश हितासंबंधांची बाधा त्यावेळच्या मध्यवर्ती सरकारला होई व त्यामुळें सरकारी निर्णय हिंदी उद्योगधंद्यांस प्रतिकूल होण्यांचाही बराच संभव असे. गेलें युद्ध सुरू होईपर्यंत एकंदर ४९ संरक्षणाबाबतच्या अर्जांचा निकाल लावण्यांत आला. त्यांपैकीं ४२ अर्जांचे बाबतींत जकात-मंडळांनीं, संरक्षण द्यावें, अशी शिफारस सरकारला केली होती. परंतु सरकारनें यांपैकीं २५ बाबींतच शिफारस पूर्णपणें स्वीकारली, ११ बाबतींत शिफारस थोडासा फेरफार करून स्वीकारली व उरलेल्या सहा बाबतींत संरक्षण देण्याचें आजिबात नाकारलें. अशा रीतीनें सरकारी प्रवृत्ति संरक्षण जकातमंडळानें सुचविलेल्या प्रमाणांत न देण्याकडे किंवा तें नाकारण्याकडे असे. याशिवाय संरक्षणासाठीं अर्ज केल्यापासून सरकारी निर्णय होईपर्यंत बराच कालावधि लागे; तोही उद्योगधंद्यास जाचक होई.

नोव्हेंबर १९४५ मध्यें मध्यवर्ती सरकारनें एक तात्कालिक जकातमंडळ (Interim Tariff Board) नेमलें. युद्धकालांत निघालेल्या व युद्धकालीं भरभराटीस आलेल्या कांहीं उद्योगधंद्यांना संरक्षण द्यावें कीं नाहीं याबद्दल चौकशी करण्याचें काम या मंडळाकडे सोपविलें गेलें. मंडळानें आपलें काम बिलंब न करतां हातीं घेऊन हिंदी








# हिंदी उद्योगधंदे व संरक्षण

उद्योगधंद्यांबाबत आपली सहानुभूति दर्शविली. १९४७ मध्यें या मंडळाची पुनर्घटना करण्यांत आली व त्याचें कार्यक्षेत्रही बरेंच वाढविण्यांत आलें १९४८ अखेरपर्यंत मंडळानें १२ संरक्षणविषयक अर्जांची छाननी करून आपल्या शिफारशी सरकारकडे सादर केल्या. याशिवाय सूत, कापड, कागद, पोलाद व सुपरफॉस्फेट यांच्या योग्य किंमतींबद्दल चौकशी करून सरकारला सल्ला देण्याचें कामही मंडळानें केलें.

एप्रिल १९४९ मध्यें नेमलेल्या फिस्कल कमिशनकडे सरकारनें जकातविषयक व संरक्षणविषयक धोरण काय असावें व तें कसें अमलांत आणावें या संबंधीं विचार करून पुढील मार्ग आंखण्याचें काम दिलें आहे. कमिशननें लोकमत अजमावण्यासाठीं व जरूर ती माहिती गोळा करण्यासाठीं एक मोठी प्रश्नपत्रिका प्रसिद्ध केली. या प्रश्नमालिकेंत दोन भाग असून एकूण १०४ मुख्य प्रश्न व कांहीं उपप्रश्नही आहेत. पहिल्या भागांत आठ निरनिराळ्या सदरांखालीं प्रश्नाचें वर्गीकरण केलें आहे. प्रश्नपत्रिकेच्या दुसऱ्या भागांत हिंदुस्थाननें आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील आपली जबाबदारी कशी पार पाडावयाची व या जबाबदारींचा संरक्षणाच्या धोरणाशीं कसा मेळ बसवावयाचा याविषयीं प्रश्न आहेत. हॅवाना जाहीरनाम्यावर ( Havana Trade and Employment Charter ) हिंदुस्थाननें आगाऊच सही केली असली तरी अशी जबाबदारी भविष्यकालांत घेतांना आपलें धोरण काय असावें याविषयीं सरकारला मार्गदर्शन करण्याचें कामही कमिशनपुढें आहे. कमिशनच्या १७ ऑगस्ट १९४९ रोजीं झालेल्या दुसऱ्या बैठकींत या प्रश्नाचा विचार १९५० च्या सुरुवातीपर्यंत लांबणीस टाकण्याचें ठरलें. कारण हॅवाना जाहीरनाम्यास अजून सर्व सही करणाऱ्या राष्ट्रांकडून अधिकृत रीत्या पुष्टि मिळाली नाहीं.

जकातीसंबंधींच्या धोरणांत विशिष्ट राष्ट्रांशीं केलेल्या व्यापारविषयक करारांचें ( Bilateral Trade Agreements ) स्थान काय असावें हेंही ठरविणें जरूर आहे. गेल्या वर्षांमध्यें पंधरा राष्ट्रांशीं हिंदुस्थाननें असे करार केले आहेत व आणखी आठ राष्ट्रांशीं असल्या करारांबाबत वाटाघाटी चालू आहेत. या करारांचा व आंतरराष्ट्रीय करारांचा ( Bilateralism *vs.* Multilateralism ) मेळ कसा बसवावयाचा हाही एक बिकट प्रश्न आहे.

युद्धकाळांत व तदनंतर जकातीच्या प्रश्नाशीं निगडित असलेला दुसरा एक प्रश्न म्हणजे आयातनिर्यात मालावरील नियंत्रणाचा. हें नियंत्रण आणखी कांहीं काळपर्यंत चालूच राहणार. तेव्हां या नियंत्रणाचें धोरण कसें असावें यासंबंधींही विचार करणें जरूर आहे. या सर्व प्रश्नांचा सांगोपांग विचार करून धोरण आंखणें हें काम कमिशनकडे आहे. १९२२ सालच्या कमिशनला आपला अहवाल तयार करण्यास दहा महिनें लागले. तेवढाच वेळ सध्यांच्या कमिशनला लागल्यास नवल नाहीं. कांहीं झालें तरी कमिशनच्या शिफारसी हिंदी उद्योगधंद्याचे वाढीस पोषक अशाच असतील अशी आशा करण्यास हरकत नाहीं. हें धोरण आंखतांना खालील आवश्यक गोष्टींकडे लक्ष पुरविलें गेल्यास हिंदी उद्योगधंद्यांची उन्नति सुलभ केल्याचें श्रेय कमिशनला मिळेल :

(१) राष्ट्रीय दृष्ट्या आवश्यक अशा उद्योगधंद्यांना संरक्षण मिळविणें म्हणजे एक दिव्य करण्यासारखें नसावें. संरक्षण योग्य प्रमाणावर व विलंब न लागतां मिळालें पाहिजे.

(२) जकातमंडळ तात्पुरतें नसावें. तें कायम स्वरूपाचें असावें व त्याचें कार्यक्षेत्र विस्तृत असावें.

(३) संरक्षणाचें धोरण अमलांत आणतांना सर्वसाधारण जनतेच्या हिताकडे दुर्लक्ष होतां कामा नये. यासाठीं संरक्षित मालाच्या किंमतींचें नियंत्रण जरूर असल्यास, त्याविषयीं सल्ला देण्याचें काम जकात-मंडळाकडे सोंपवावें.

(४) उद्योगधंद्यांची कार्यक्षमता अजमाविण्यासाठीं उत्पादन-खर्चाचे सविस्तर आंकडे जकातमंडळास मिळूं शकतील अशी व्यवस्था असावी.

(५) वाढती जबाबदारी योग्यपणें पार पाडण्यासाठीं जकातमंडळास पुरेसा अधिकारी वर्ग व अधिकार दिले जावे.






# 'जग समृद्ध करणारी विभूति'

[ जॉर्ज आर्वेल ( जन्म १९०३ ) इंग्लिश निबंधकार व कादंबरीकार यानें 'पार्टिझन रिव्ह्यू'च्या जानेवारी १९४९ च्या अंकांत म. गांधींसंबंधीं कांहीं विचार प्रकट केले आहेत, त्यांचा सारांश खालीं दिला आहे. जॉर्ज आर्वेल स्वतःविषयीं लिहितो—" माझा भावनात्मक कल डाव्या गटांकडे आहे परंतु लेखक हा पक्षाच्या शिक्क्यापासून दूर राहिला तरच तो प्रामाणिक राहील असा माझा विश्वास आहे." ]

साधूंचें साधुत्व कसाला उतरून बावनकशी ठरल्याशिवाय प्रत्येक साधु दोषीच समजला पाहिजे. अर्थात् साधुत्वमापनाचा मानदंड प्रत्येक साधूच्या बाबतींत भिन्न असतो. गांधींच्या बाबतींत मुख्यतः दोन मुद्दयांचा विचार केला पाहिजे:

(१) त्यांच्या जीवनकार्याची प्रेरकशक्ति अहंकारी होती काय ? आपणासारखा एक सामान्य अर्धनग्न वृद्ध मनुष्य केवळ अध्यात्मशक्तीच्या जोरावर ब्रिटिश साम्राज्य हलवूं शकतो ह्या जाणिवेंतून गांधीजींचा अहंकार उद्भवण्याचा संभव आहे. (२) लांड्यालबाड्या आणि जबरदस्ती ह्यांनीं भरलेल्या राजकारणाच्या क्षेत्रांत प्रवेश करून गांधीजींनीं आपल्या मूलतत्त्वांना मुरड घातली काय ? गांधीजींची जीवनयात्रा अवलोकन केली असतां ह्या दोन्हीं प्रश्नांचें नकारार्थी उत्तर द्यावें लागेल. त्यांच्या आयुःक्रमावरून गांधीजी हे जसे साधु होते तसेच चाणाक्ष व कार्यक्षमहि होते असें दिसतें. मनांत आणते तर ते उत्तम वकील, व्यापारी किंवा अधिकारी झाले असते.

१९४२ पूर्वी गांधीजींना ब्रिटिश लोक 'आपला माणूस' म्हणून ओळखत असत. वास्तविक त्यांच्या राष्ट्रीय वृत्तीमुळें ते ब्रिटिशांचे शत्रु! तीच गोष्ट भांडवलवाल्यांची. गांधीजींच्या अहिंसेनें लोकक्षोभापासून व समाजवाद्यांपासून आपला बचाव होईल ह्याची दोघांनाहि खात्री वाटत होती. अर्थात् ह्या अपेक्षा कितपत खऱ्या ठरल्या असत्या ही गोष्ट वेगळी. "दुसऱ्याला फसवणारे शेवटीं स्वतःच फसतात" ही गांधीजींची उक्ति त्यांनीं ध्यानांत घेतली नव्हती. दुसऱ्या संभाव्य जेत्याशीं अहिंसेचें शस्त्र वापरूं असें गांधीजींनीं म्हणतांच ब्रिटिश हुजूरपक्षाला त्यांचा खरा राग आला.

हें जरी असलें तरी गांधीजींबद्दल राजकीय दृष्टीनें तिरस्कार असणारांनाहि त्यांच्याबद्दल एक तऱ्हेचा आदर असे. गांधीजींबद्दल मत देतांना सामान्यांपेक्षां उच्चतर तत्त्वें लावावीं लागतात हें सर्वांनीं मान्य केलें होतें. वैयक्तिक अधःपात किंवा सामान्य, क्षुद्र महत्त्वाकांक्षा ह्यांचा त्यांना स्पर्शहि नव्हता. त्यांच्या शारीरिक धैर्याकडे फारच थोड्यांचें लक्ष गेलें आहे. परंतु सबंध आयुष्यभर आणि विशेषतः मरणकालीं त्यांचा हाच गुण विशेष दिसतो. स्वतःच्या प्राणाला जपणारी सार्वजनिक क्षेत्रांतील दुसरी कोणतीहि व्यक्ति स्वतःबद्दल खात्रीनें जास्त काळजी घेईल. दुसरी मोठी गोष्ट म्हणजे गांधीजींचा ब्रिटिश प्रतिकार हा बहुसंख्य जित राष्ट्रांतील लोकांप्रमाणें जेत्यांबद्दलच्या मत्सरांतून किंवा स्वतःच्या न्यूनगंडांतून उद्भवलेला नव्हता. वर्णविषमतेचें पहिलें प्रत्यंतर आफ्रिकेंत येतांच गांधीजींना आश्चर्यच वाटलें आहे! दुसऱ्यांतील कपट ओळखण्याचा चाणाक्षपणा जरी त्यांच्यांत होता तरी शत्रूच्या








हेतूबद्दल त्यांनीं कधीं शंका घेतली नाहीं. उलट प्रत्येकाच्या सत्प्रवृत्तीला आपण आवाहन करूं असा त्यांनीं विश्वास धरला. एका अर्थी आयुष्यभर वर्णविषयक झगडा करून देखील त्यांनीं वंशविद्वेष किंवा अधिकारविद्वेष ( Status hatred ) ह्यांचा स्वतःला स्पर्श होऊं दिला नाहीं. गिरणीवाला लक्षाधीश, प्रांताचा ब्रिटिश गव्हर्नर, एक अर्धपोटी मजूर किंवा सामान्य ब्रिटिश सैनिक हीं सर्व माणसेंच आहेत अशी त्यांची भावना होती व ह्या सर्वांकडे पाहण्याची त्यांची समदृष्टि होती. त्यामुळें आफ्रिकेंतहि युरोपियन मित्रांचा त्यांना तुटवडा पडला नाहीं.

साधूंचे दोन प्रकार आहेत : कांहींजण प्रथमपासूनच अतिधार्मिक प्रवृत्ति दाखवतात, तर कांहीं करून करून भागल्यानंतर साधु बनतात. गांधीजी ह्या दोन्ही प्रकारांत बसत नाहींत. लंडनमधील त्यांचें विद्यार्थिजीवन, फॅशनेबल जंटलमन् होण्याचे त्यांचे प्रयत्न, ते इतर सामान्यांप्रमाणेंच होते, असें दाखवतात. त्यांचीं जहाल मतें कांहींशीं स्वतःच्या मताविरुद्ध बनलेलीं आहेत. आपल्या पूर्वायुष्यांतील पापांची स्पष्ट कबुली गांधीजींनीं आत्मचरित्रांत दिली आहे. वास्तविक कबुली देण्याइतकें पापच त्यांच्या हातून घडलेलें नाहीं ! अलीकडे मरणापूर्वी गांधीजींच्याजवळ असलेल्या संपत्तीचें छायाचित्र देत असतात : सर्व वस्तूंची किंमत ५ पौंडांपेक्षां जास्त होणार नाहीं. गांधीजींच्या आयुष्यांतील पापांची गोळाबेरीज इतकीसुद्धां भरणार नाहीं ! लहानपणापासून वृत्ति अत्यंत कळकळीची, प्रवृत्ति धार्मिक म्हणण्यापेक्षां नैतिक; वयाच्या तिसाव्या वर्षापर्यंत आयुष्याला विशेष दिशा नाहीं. तोंपर्यंतचें सार्वजनिक कार्य म्हणजे शाकाहाराचा प्रचार. पुढील आयुष्यांतील साधुत्वाच्या खालीं गांधीजींची चाणाक्ष व्यापारी वृत्ति दडलेली दिसते. तरीहि शत्रूला सुद्धां त्यांच्या आयुष्यांत दुर्वर्तन आढळणार नाहीं. केवळ आपल्या अस्तित्वानेंच जग समृद्ध करणारी गांधीजी ही एक विभूति होती.

युरोपमधील डाव्या गटाचे लोक गांधींना आपल्यामधील समजत; परंतु त्यांच्याप्रमाणें गांधीजी केवळ मानवतावादी नव्हते. ऐहिक व भौतिक सुखावरचा त्यांचा भर नव्हता. परमेश्वराच्या अस्तित्वावरील अढळ विश्वास हें त्यांच्या प्रेरणेचें मूळ होतें. मानवजातीच्या किंवा परमेश्वराच्या सेवेसाठीं ब्रह्मचर्य, शाकाहार इत्यादि कठोर व्रतें ते आपल्या साधनेंत अवश्य मानीत. मित्रा-मित्रांतील किंवा कुटुंबांतील व्यक्तींसंबंधीं स्नेह गांधीजी भयप्रद मानीत. परमेश्वराची किंवा मानवजातीची सेवा करणाराला व्यक्तिगत पाश कमी करावे लागतात. गांधीजींच्या आपल्या पत्नी-मुलांशीं वागतांना दिसणाऱ्या कठोरपणाचा अशा तऱ्हेनें अर्थ लावतां येईल. माणुसकीला न पटणारा कठोर आग्रह त्यांनीं अनेक वेळां धरला आहे. माणुसकीनें वागायचें ठरवलें तर अनेक वेळां स्वतःच्या तत्त्वांना मुरड घालावी लागते; म्हणूनच सामान्य माणूस साधु होण्याची आशा करीत नाहीं. युरोपीय मानवतावाद्यांनीं मानवाकडे जास्त लक्ष दिलें आहे. गांधीजी ईश्वरसेवा प्रधान समजत असत व त्यामुळें माणुसकीच्या दृष्टीनें त्यांचे मार्ग कठोर वाटतात.

त्यांच्या शांततावादाचा उगमहि त्यांच्या धार्मिक प्रवृत्तींत आहे. त्यांच्या मतें शांततावाद ही एक जीवनवृत्ति किंवा तंत्र आहे. तिचे निश्चित राजकीय परिणाम होतात. युरोपीय शांततावाद्यांपेक्षां त्यांची दृष्टि निराळी होती. सत्याग्रहाला निःशस्त्र प्रतिकार ( Passive Resistance ) ह्या प्रतिशब्दाला त्यांचा विरोध होता. शत्रूसंबंधीं द्वेषभावना न ठेवतां अगर त्याचा द्वेषविषय न होतां त्याच्याशीं अहिंसक युद्ध चालवणें हा त्यांच्या मतें सत्याग्रहाचा अर्थ होता. स्वतः राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींत अग्रभागीं असल्यानें युद्धांत आपल्याला कोणाची तरी बाजू घ्यावी लागेल हें त्यांना माहीत होतें. युरोपीय शांततावाद्यांप्रमाणें शांतितत्त्वापासून उद्भवणारे कठिण प्रश्न त्यांनीं डावलले नाहींत. १९३८ सालीं लुई फिशरशीं बोलतांच गांधीजींनीं म्हटलें कीं, 'ज्यूंनीं सामुदायिक आत्महत्या करावी.' युरोपांतील शांततावादी ह्या प्रश्नाचा विचार करतांच शांततावादाला बगल देण्यास तयार होते! गांधीजींनीं नाझी आक्रमणाच्या वेळीं स्वतःच्या देशांतील लोकांसहि हेंच धोरण स्वीकारण्यास सांगितलें होतें.

आंतरराष्ट्रीय राजकारणांत अहिंसक प्रतिकार कसा उपयोगांत आणावयाचा हा प्रश्नच आहे.





अनुक्रमणिका

कदाचित् गांधीजींना सर्वंकष हुकुमशाहीचें यथार्थ स्वरूप कळलेलें नसावें. हुकुमशाही राष्ट्रांत प्रस्थापित राज्याचे टीकाकार एका रात्रींत बेमालुम नाहींसे होतात ! अशा ठिकाणीं अहिंसक प्रचारास संधि मिळणार कशी ? त्यामुळें आंतरराष्ट्रीय राजकारणांत शांततावादाला केवळ ध्येयाचें स्वरूप येतें किंवा त्याचें समजावणींत रूपांतर होतें. मृत्यू-पूर्वी ह्या प्रश्नाचा गांधीजी विचार करीत होते असें दिसतें. मानवी संस्कृति आणखी एका महायुद्धाची आपत्ति सहन करून तगूं शकेल कीं नाहीं ह्याची शंका आहे; तेव्हां गांधीजींच्या अहिंसक मार्गाचा गंभीरपणें विचार करावा लागणार आहे.

गांधीजींना आंतरराष्ट्रीय राजकारणांतील अनेक प्रश्न कळले नाहींत असें मानलें तरी त्यांचा विचार करण्याचें मनोधैर्य त्यांच्यामध्यें निश्चित होतें. त्यामुळें त्यांचीं मतें मान्य नसलीं तरी राजकीय विचारवंत ह्या दृष्टीनें त्यांच्यांत कांहीं उणीवा होत्या किंवा त्यांचें जीवन अपयशी ठरलें असें मला वाटत नाहीं. गांधीजींबद्दल अनेक आक्षेप घेण्यांत येतील. हिंदुस्थानला स्वातंत्र्य शांततेच्या मार्गानें मिळालें तें गांधीजींमुळें कीं ब्रिटिशांच्या अगतिकपणामुळें ? हिंदु-मुस्लिम रक्तपातानें गांधीजींच्या तत्त्वांना मूठमाती मिळाली कीं काय ? गांधीजींच्या साधुत्वामुळें—ते स्वतः कधींच साधु म्हणवून घेत नसत—त्यांच्या माणुसकीला बाध आला कीं काय ? असे अनेक प्रश्न विचारण्यांत येतील. परंतु एवढें मात्र निश्चित कीं राजकारणी पुरुष ह्या दृष्टीनें इतरांशीं तुलना करतां गांधीजींनीं आपल्यामागें अत्यंत निर्मल असा सुगंध ठेवला आहे.

—प्रा. अ. के. भागवत

---

## चरित्र-परिचयः—

**महात्मा गांधी :** लेखकः— एच्. एस्. एल्. पोलाक, एच्. एन्. ब्रेल्सफर्ड आणि लॉर्ड पेथिक-लॉरेन्स, ( ओल्डहॅम प्रेस लि., लंडन; प्रकाशन १९४९, प्रस्तावना : सरोजिनी नायडू, पानें ३२० ).

अन्य सांस्कृतिक वातावरणांत वावरणाऱ्या व्यक्तींना म. गांधी कसे दिसतात हें पाहणें केवळ मनोरंजक नव्हे तर उद्‌बोधकहि वाटतें. त्यामुळें त्रयस्थाच्या दृष्टीनें गांधीजींच्या 'सत्याच्या प्रयोगां'चें मूल्यमापन होऊन गांधीजींनीं अखिल मानवजातीला कोणता संदेश दिला हें कळूं शकतें. ह्या चरित्र-ग्रंथाच्या काव्यमय, हृदयंगम प्रस्तावनेंत सरोजिनी-देवींनीं म्हटल्याप्रमाणें ज्यांचा गांधीजींशीं अनुयायी म्हणून संबंध आला त्यांना गांधीजींबद्दल लिहिणें म्हणजे पवित्र गोष्टींची निर्दयतेनें चिरफाड करण्यासारखें वाटतें ( पृष्ठ ७ ). ह्या उलट परदेशी व बऱ्याच अंशीं त्रयस्थ असलेल्या पण गांधीजींबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्या ह्या तीन इंग्रज लेखकांना गांधीजींचें गुणदोषविवेचन जास्त निःसंकोचपणें करतां आलें आहे.

### 'एक विस्मयकारक जीवन'

चरित्र मुख्यत्वेंकरून इंग्रजी जनतेसाठीं लिहिलेलें असल्यानें पाश्चात्यांना गांधीजींच्या तत्त्वज्ञानांतील व राजकारणांतील वाटणाऱ्या ब्रह्मचर्य, शाकाहार, अहिंसा, साम्राज्य व युद्धविरोध इत्यादि कूट प्रश्नांचें स्पष्टीकरण लेखक करतांना दिसतात. हे प्रश्न समजावून घेण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. गांधीजींच्या खाजगी आयुष्यांतील अनेक बारीक सारीक








गोष्टींचा पोलॉक ह्या हेतूनें उल्लेख करतात. गांधीजींचा केवळ वाङ्‌निश्चय झाला नव्हता तर त्यांचा विवाहसुद्धां झाला होता (पृ. ११); त्यांच्या अहिंसेला पोषक असें त्यांचें सांस्कृतिक व कौटुंबिक वातावरण होतें (पृ. १०); ते ब्राह्मण नसून मोध-बनिया होते (पृ. ९); त्यांच्या शाकाहारांत अंडीं सुद्धा त्याज्य होतीं (पृ. १६); इत्यादि गोष्टींचा खुलासा पोलॉक करतात. इंग्लंडमध्यें आपल्या बालविवाहासंबंधीं बोलण्यास गांधीजींना वाटणाऱ्या संकोचाचा उल्लेख करून पोलाक इंग्रजी मनोवृत्तीला साजेसें असें पुढील मनोरंजक विधान करतातः 'गांधींचे सौम्य डोळे सोडले तर पाश्चात्य दृष्टीनें गांधी दिसण्यांत चांगले होते असें म्हणतां येणार नाहीं; पण आयुष्यभर कित्येक प्रसिद्ध स्त्रियांना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल जबरदस्त आकर्षण वाटलें आणि त्यांच्या मित्रगणांत कित्येक ब्रिटिश आणि हिंदी स्त्रियांचा समावेश होत असे!' (पृ. १७). गांधीजींना सुरुवातीला जाहीर भाषणासंबंधीं वाटणारी लाज आयुष्यभर कमी झाली नाहीं (पृ. १५); 'त्यांचें आतिथ्य नमुनेदार होतें व त्यांच्यामध्यें शेवटपर्यंत दिसणारी बोचक विनोदी वृत्ति (teasing sense of humour) सदैव जागृत होती.' (पृष्ठ ४९). गांधी टोपीचा जन्म आफ्रिकेंतील तुरुंगांत झाला (पृष्ठ ६१); इत्यादि मनोरंजक माहिती आपल्याला पोलाक करून देतात. गांधीजींच्या अभ्यासकांना, गांधीजींवर ज्या पुस्तकांचा असर पडला आहे अशा पुस्तकांचे पोलॉक यांनी केलेले उल्लेख फार मोलाचे वाटतील. पूर्वायुष्यांत गांधीजींनीं वाचलेलीं हीं पुस्तकें त्यांच्या मनाची घडण कशी बनत गेली हें सांगतात. पुढें त्यांचें तत्त्वज्ञान एकदां पक्कें झाल्यावर ब्रेल्सफर्ड यांना त्यांनीं जमविलेल्या कोणत्याहि पुस्तकांवरून त्यांच्या मनाचा थांग लागला नाहीं (पृ. १०५). परंतु पूर्वायुष्यांत मात्र आपल्या तत्त्वज्ञानाला पोषक अशींच पुस्तकें गांधीजींनीं वाचलीं व त्या सर्वांचे उल्लेख पोलॉक करतात. ह्यापैकीं रस्किनच्या (Unto This Last) ह्या पुस्तकाची ओळख पोलॉकनींच गांधीजींना करून दिली. ह्या पुस्तकावरून, व्यक्तींचें हित हें सर्व हितांत सामावलें आहे, सर्व व्यवसाय—मग तो वकिलीचा असो कीं न्हाव्याचा असो—समान दर्जाचे आहेत, श्रमजीवी व हस्तव्यवसायी ह्यांचें जीवन जगण्यासारखें आहे, हीं तीन महान् तत्त्वें गांधीजी शिकले (पृष्ठ ४८).

पोलॉक हे स्वतः सॉलिसिटर व गांधीजींचे वकिली सहायक असल्यानें गांधीजींच्या वकिलीबद्दल ते आपला प्रत्यक्ष अनुभव सांगूं शकतात. आपली सत्यनिष्ठा गांधीजींनी वकिलीसारख्या धंद्यांतहि सोडली नाहीं; आफ्रिकेंतील आयुष्यभर त्यांनीं प्रथम कोर्टाबाहेर तडजोडीच्या मार्गानें तंटे मिटविण्याचे प्रयत्न केले (पृ. २९); मुकद्दमा चालू असतां अशील आपली फसवणूक करीत आहे, असें आढळून आलें तर ते वकीलपत्र सोडण्यास मागेंपुढें पहात नसत (पृ. ४९); ह्यामुळें त्यांचें पैशाचें नुकसान तर झालें नाहींच; पण ह्यापेक्षांहि महत्त्वाचें म्हणजे त्यांना आपली सदसद्विवेकबुद्धि कधीं विकावी लागली नाहीं (पृ. २५).

गांधीजींच्या आफ्रिकेंतील सत्याग्रह-मोहिमेचा उगम, तिला मिळालेलें असामान्य यश, त्यांचें लोकोत्तर सौजन्य व क्षमाशीलता यांचें पोलॉक यांनीं अत्यंत आत्मीयतेनें वर्णन केलें आहे. ह्या सर्व कार्यांत ते गांधीजींचे उजवे हात असल्यानें हें वर्णन अत्यंत वास्तववादी व चटकदार झालें आहे. गांधीजींनीं सक्तीच्या नोंदणी-पत्रकावर आंगठे देण्यास हिंदी नागरिकांना सांगितल्यानें त्यांनीं हिंदी लोकांशीं बेइमानी केली असें वाटून त्यांना मारणारा पठाण आपली चूक कळून आल्यावर क्षमा मागून जाहीरपणें त्यांच्याशीं हस्तांदोलन करतो, ह्या महान् क्षणाचें वर्णन (पृ. ६९); म. गांधींनीं लांचखाऊ इंग्रजांना सुद्धां क्षमा करून 'पापी मनुष्याचा नव्हे तर पापाचा तिरस्कार करा' हें तत्त्व प्रत्यक्षांत आणल्याची हकीकत; त्यांची सर्वां भूतीं समदृष्टि (पृ. ४४); हे पोलाक ह्यांच्या कथनशैलीचे व गांधीजींच्या महान् व्यक्तित्वाचे मनोहर नमुने आहेत.

गांधीजींच्या साम्राज्यविरोधाशीं मात्र पोलाक सहमत नाहींत. साम्राज्य व वसाहती ह्यांचे परस्परसंबंध—वसाहती ह्या स्वायत्त असल्यानें साम्राज्य






सरकार त्यांच्या अंतर्गत कारभांत प्रत्यक्ष हस्तक्षेप करूं शकत नव्हते, ह्या गोष्टी—गांधीजींना आयुष्यभर कळल्या नाहींत असें ब्रेल्सफर्डप्रमाणेंच पोलॉकनाही वाटलें (पृ. ४०).

सत्याग्रह म्हणजे आत्म-शक्ति; हें तत्त्वज्ञान प्रत्यक्षांत आणून गांधीजींनीं एक महान् प्रयोग जनतेला शिकवला व आपल्या समदृष्टीनें इंग्रजांचीहि सहानुभूति मिळविली हें (Triumph of Conscience) ह्या प्रकरणांत पोलॉक सांगतात; सत्याग्रह म्हणजे आत्म-शुद्धि व सेवावृत्ति हीं तत्त्वें गांधीजींनीं झुलू व बोअर युद्धांत जनतेची सेवा करून बिंबवलीं; म्युनिसिपल संपाच्या वेळेस रस्ते व संडास साफ करून त्यांनीं 'महाभंगी' ही पदवी मिळवली (पृ० ३२); इत्यादि गोष्टींवरून ह्या सुरुवातीच्या वर्षीचें 'एका विस्मयकारक आयुष्य-क्रमाचा शेवट' (End of an amazing Career, p. 94) हें वर्णन सार्थ आहे.

एका इंग्रज मित्रानें विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देतांना गांधीजींनीं काढलेले उद्गार आज ४० वर्षांनंतर पोलॉकना सार्थ वाटतात. 'तुम्हांला सत्कार्यासाठीं हुतात्मा होणें आवडेल काय?' असें विचारलें असतां गांधीजींनीं उत्तर दिलें, "मी माझ्या कार्याला पूर्णपणें वाहून घेतलें आहे; तेव्हां त्यासाठीं मी केव्हांहि मरण्यास किंवा कोणतीहि गोष्ट करण्यास तयार आहे." (पृ० ६५)

### "बुद्धानंतरचे सर्वश्रेष्ठ हिंदी; सें. फ्रँसिस ऑफ ॲसिसीनंतरचे सर्वश्रेष्ठ साधु"

१९१५ सालीं वयाच्या ४६ व्या वर्षी हिंदुस्थानांत आल्यापासून तों १९३९ च्या महायुद्धाच्या सुरुवाती-पर्यंतचा जीवनवृत्तांत ब्रेल्सफर्ड यांनीं वर्णिला आहे. पोलॉक हे गांधीजींचे अनुयायी व निकट सहकारी असल्यानें ते गांधीजींबद्दल जिव्हाळ्यानें लिहितात. ब्रेल्सफोर्ड यांची आणि गांधीजींची गांठ दांडी-सत्याग्रहाच्या वेळीं प्रथम पडली व कांहींसा निकट संबंध १९३१ सालीं गांधीजी गोलमेजपरिषदेला गेले त्या वेळेस आला. त्यामुळें गांधीजींबद्दल वैयक्तिक माहिती न देतां ते जास्त वस्तुनिष्ठ व त्रयस्थ भूमिकेनें लिहितात.

ब्रेल्सफोर्ड यांनीं गांधीजींबद्दल वैयक्तिक उल्लेख फारच थोडे केले आहेत. 'त्यांचें इंग्रजी भाषण वेल्श उच्चारपद्धतीचें परंतु अत्यंत बरोबर, अस्खलित व सहज असे; संभाषणांत ते सफाईनें विनोद करीत; परंतु जाहीर भाषणांत उपरोध वा व्याजोक्ति ह्यांचा ते क्वचितच उपयोग करीत' (पृ. १४३). आश्रमां-तील त्यांच्या दिनचर्येचें वर्णनहि ब्रेल्सफर्ड करतात; फिरायला जाते वेळीं त्यांच्या कंबरेला एक विचित्र (clumsy) जुन्या पद्धतीचें घड्याळ लोंबत असे, असें निरीक्षण ब्रेल्सफर्ड करतात (पृ० १४४); इंग्लंडमध्यें असतां उशीर झाल्याबद्दल गांधीजींनीं आपली पुन्हां पुन्हां क्षमा मागितली असें ते म्हणतात (पृ० १९०); बादशहांना भेटण्यास गेले असतां 'तुमचे कपडे कमी नाहींत कां' असें कोणी म्हटलें असतां 'बादशहांनीं आम्हांला दोघानांहि पुरतील इतके कपडे घातले होते' असें उत्तर गांधीजींनीं दिल्याचा उल्लेख ब्रेल्सफर्ड करतात (पृ० १९१).

गांधीजींच्या तत्त्वज्ञानांतील कूटप्रश्नांचा अर्थ लावतांना सर्वांत जास्त कष्ट ब्रेल्सफर्डना पडल्यासारखे वाटतात. गांधी–तत्त्वज्ञानांतिल प्रमुख गोष्टींना त्यांनीं विरोधच केला आहे. त्यांची भूमिका बुद्धिनिष्ठ समाजवाद्याची दिसते. गांधीजींच्या राजकीय मुत्सद्देगिरीबद्दलही अनेक प्रसंगीं त्यांनीं शंका प्रदर्शित केली आहे. गांधीजींच्या आरोग्य–व–निसर्गोपचाराची संभावना तर त्यांनीं 'वैदूगिरी' 'Quack Remedies' म्हणून केली आहे (पृ०१२५). इंग्रजी वैद्यकीविरुद्ध गांधीजींचा बळकट पूर्वग्रह १९२४ सालच्या त्यांच्या ऑपरेशननें नाहींसा झाला असेंहि ते सांगतात (पृ. १६१).

गांधीजींच्या साबरमती आश्रमाची प्रत्यक्ष पाहि-लेली माहिती नवव्या प्रकरणांत देऊन ब्रेल्सफर्ड त्यांच्या तत्त्वज्ञानाची चिकित्सा करतात. आश्रमांतील लैंगिक संबंधांना असलेल्या बंदीचा उल्लेख करून त्यांत गांधीजी हिंदु परंपरेला विरोधी आहेत असें ते म्हणतात (पृ. १०८). गांधीजींचे आहार-विषयक काटेकोर नियम हे हिंदूंच्या 'अन्नासक्तीला' व जातिभेदाला विरोधी म्हणून आले असावेत असें त्यांना वाटतें [पृ. १०८]. गांधीजींच्या स्वदेशीच्या तत्त्वज्ञानावर ब्रेल्सफर्डनीं फार जोराची टीका केली






आहे. गांधीजींच्या मतें, स्वदेशीनें आपण आपल्या जवळच्या शेजाऱ्यांवर ( immediate neighbourhood ) अवलंबून रहातों. उदाहरणार्थ, धर्माच्या बाबतींत आनुवंशिक धर्मावर, राजकारणांत येथें उदयास आलेल्या संस्थांवर, आणि अर्थशास्त्रांत येथें तयार झालेल्या जिनसांवर. ह्यांपैकीं शेजारधर्माची कल्पना ब्रेल्सफर्डना पटत नाहीं. गांधीजींच्या अनुयायांच्या हातांत ह्या कल्पनेचा अर्थ कमालीचा संकुचित होत गेला हें ब्रेल्सफर्ड यांनीं आचार्य कालेलकरांच्या Gospel of Swadeshi ह्या ग्रंथाचा आधार घेऊन दाखविलें आहे ( पृ. ११८ ). यांतील 'आपण आपणांपेक्षां भिन्न सामाजिक चालीरीती असलेल्यांशीं मिसळूं नये ' ह्या वाक्यानें गांधीजींची स्वदेशाची कल्पना आक्रमक हिंदुत्वाच्या कल्पनेशीं जुळते व आक्रमक हिंदुत्वाच्या अनुयायांच्या हातूनच गांधीजींना मरण आलें ह्या घटनेची ब्रेल्सफर्ड आठवण करून देतात ( पृष्ठ ११८ ). पुढें आपणांस ह्या पुस्तकाचा बराचसा भाग मान्य नाहीं असें गांधीजींनीं म्हटल्याचें मात्र ब्रेल्सफर्ड नमूद करतात.

अहिंसेसंबंधीं ब्रेल्सफर्ड म्हणतात कीं, 'माझ्या मतें गांधीजींनीं त्यावर चुकीचा व अवास्तव जोर दिला.' भगवद्गीता व हिंदुधर्म ह्यांत अहिंसा आहे हें गांधीजींचें म्हणणें शब्दाची ओढाताण असल्यासारखें त्यांना वाटतें ( पृ. ११२ ). क्षात्रिय वर्णाचा समावेश हिंदूंच्या चातुर्वर्ण्यांत होत असल्यानें अहिंसातत्त्व हिंदुस्थानला मान्य होतें असें म्हणणें कठीण आहे असें त्यांना वाटतें. सामाजिक बदल हृदयपालटानें व्हावा ह्या गांधीजींच्या आग्रहावर ब्रेल्सफर्ड यांची शंका अशी आहे कीं, मिरासदार सत्ताधारी आपली सत्ता टिकविण्यास जर पाशवी शक्तींचा अवलंब करतात तर त्यांचा जुलूम नाहींसा करण्यास प्रतिपक्षानें तोच मार्ग अवलंबिला तर त्यांत चूक काय? (पृ० ११६). गांधी-तत्त्वज्ञानाचा धार्मिक पाया ब्रेल्सफर्डना मान्य नाहीं; त्यांच्या तत्वज्ञानांत सौंदर्यदृष्टि किंवा कलाप्रेम ह्यांना स्थान नाहीं असें त्यांना वाटतें. पण असें असूनहि भावनांच्या उदात्तीकरणांत व स्वतः अत्यंत आनंदी राहण्यांत गांधीजींना असामान्य यश आलें आहे (पृ० ११५). म्हणून गांधीजी हे गौतम बुद्धानंतर सर्वांत मोठे हिंदी आणि सेंट फ्रॅन्सिस ऑफ आसिसीनंतरचे सर्वांत मोठे साधु होऊन गेले असा निष्कर्ष ब्रेल्सफर्ड काढतात ( पृ. ११८ ). पाश्चात्य जगावर म. गांधींचें फार मोठें ऋण आहे असें त्यांना वाटतें. आधुनिक जगांत हिंसा जास्तींत जास्त हानिकारक ठरली असून निरुपयोगी होऊं लागली आहे. तेव्हां जागतिक प्रश्न सोडविण्यासाठीं अहिंसा, आत्मक्लेश व आग्रह यांचाच अवलंब करावा लागेल असें ते शेवटीं म्हणतात (पृष्ठ ११६ ).

पहिल्या महायुद्धांत स्वतः रिक्रूटिंग सार्जंट होऊन शस्त्रें मिळविण्यास व तीं वापरण्यास शिकण्यास ही आपणास चांगली संधि आहे असा जो युद्धप्रचार गांधीजींनीं केला त्याचा आणि अहिंसातत्त्वाचा ब्रेल्सफर्डना मेळ घालतां येत नाहीं. ह्यांत केवळ ब्रिटनशीं शेजारधर्मानें प्रेरित होऊन गांधीजी तत्त्वच्युतीला उद्युक्त झाले असें त्यांना वाटतें ( पृ. १२५ ). ह्या प्रसंगीं गांधीजींच्या मनांत जो नैतिक संघर्ष चालला होता त्याचेंच प्रतिबिंब १९१४ व १९१८ सालीं त्यांना आलेल्या आजारांत पडलें असेल काय असा मानसशास्त्राच्या दृष्टीनें गमतीचा प्रश्न ते विचारतात ( पृ. १२५ ) !

ब्रेल्सफर्ड यांच्या मतें खिलाफत चळवळ ही चुकीच्या पायावर आधारलेली होती; कारण हिंदी मुसलमान ह्या चळवळीकडे मध्ययुगीन व फाजील धर्माभिमानी दृष्टीनें पहात होते तर तुर्की लोकांना ह्या चळवळींतून मध्ययुगीन परंपरेचें जूं फेंकून द्यावयाचें होतें ( पृ. १३१ ). व्यवहारांत मात्र हिनें हिंदु-मुस्लिम ऐक्य तात्पुरतें साधलें, हें त्यांना मान्य आहे.

गांधीजींचा कौन्सिलबहिष्काराचा आग्रह ब्रेल्सफर्डना ' विवाद्य डावपेचां 'पैकीं वाटतो व ह्या नकारात्मक धोरणानें त्यांची राजकीय पकड ढिली झाली असें वाटतें ( पृ. १३६–३७ ). गांधीजींनीं पेटविलेल्या परदेशी कापडाच्या होळींत त्यांना मुत्सद्देगिरीपेक्षां नाट्यच जास्त दिसतें (पृ० १४९); हातसुताची कॉंग्रेस सभासदत्वाची अट त्यांना शहाणपणाची वाटत नाहीं ( पृष्ठ १६३ ).






१९२० च्या 'एक वर्षांत स्वराज्य' या घोषणेनें हिंदी जनमनाची विलक्षण पकड घेतली हें ब्रेल्सफर्डना मान्य आहे व त्या वेळेची असामान्य जागृति पाहून ते ह्या वर्षाला 'चमत्कार–वर्ष' (Annus Mirabilis) म्हणतात (पृ० १५०). खिस्ताचें पुनरुज्जीवन होणार ह्या समजुतीनें मध्ययुगीन खिस्त्यांना जी उत्सुकता वाटत होती तशीच हिंदी लोकांना वाटत होती असें त्यांना दिसतें (पृ० १४१).

चौरीचौऱ्याच्या अत्याचारानंतर गांधीजींनीं आपली चळवळ मागें कां घेतली ह्याबद्दल ब्रेल्सफर्डची मीमांसा अशी आहे : गांधीजींचें मन नैतिक व भौतिक किंवा व्यावहारिक ह्या दोन पातळींवर काम करीत असे. चळवळीचा कार्यक्रम ठरवितांना, तो लोकांना समजावून सांगतांना ते भौतिकवादी व व्यवहारी भासत; परंतु त्यांचा खरा आधार त्यांचें नैतिक तत्त्वज्ञान असे. आपणास परमेश्वराचा आधार आहे व त्याच्या आदेशानें आपण वागतों असें ते म्हणत तेव्हां ते केवळ आलंकारिक भाषा न बोलतां मनोमय श्रद्धेनें बोलत. अनेक शुद्ध मनाच्या व्यक्तींनीं कार्य हातीं घेतलें तर त्याला यश येणारच ह्याबद्दल त्यांची असीम श्रद्धा होती; म्हणून साधनांच्या शुद्धतेसाठीं त्यांनीं चळवळी थांबविण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं (पृ० १५५–५६). फाळणीसंबंधींच्या गांधीजींच्या मनोवृत्तीचें विवेचन करतांना पुढें पेथिक-लॉरेन्सही असाच निष्कर्ष काढतात (पृष्ठ ३१३). चळवळीचे तात्कालिक फायदे लक्षांत न घेतां ते नैतिक प्रश्नांकडे जास्त लक्ष देत असत, असें पेथिक्-लॉरेन्स व ब्रेल्सफर्ड यांचें दोघांचेंहि म्हणणें आहे. ह्याच संदर्भात जातां जातां ब्रेल्सफर्डनीं, बार्डोली सत्याग्रह मागें घेतांना गांधीजींना जमीनदारांचें हित बघावयाचें होतें या पामदत्त यांच्या आक्षेपाचें खंडन केलें आहे. ते म्हणतात : बार्डोलीची शेती रयतवारी पद्धतीची होती, तेव्हां तेथें जमीनदाराच्या हितरक्षणाचा प्रश्नच येत नाहीं (पृ. १५७). पुढील महत्त्वाच्या उद्गारांवरून गांधीजींच्या राजकीय नेतृत्त्वाबद्दल ब्रेल्सफर्ड यांचें मत फारसें चांगलें दिसत नाहीं. १९२२ सालीं आयर्लंड–आणि–मध्यपूर्वेंत साम्राज्याला जे धक्के मिळत होते ते लक्षांत घेतां 'खऱ्या क्रान्तिकारक नेतृत्वा'ला फार मोठें यश मिळालें असतें, असें ते म्हणतात (पृ. १५२).

ह्या दोन्ही चळवळींबद्दल ब्रेल्सफर्डना सहानुभूति वाटते, परंतु वर्धाशिक्षणामधील शिक्षण स्वावलंबी करण्याची कल्पना त्यांना व्यवहार्य वाटत नाहीं. हस्तव्यवसायाला दिलेलें महत्त्व फाजील आहे असें त्यांना वाटतें (पृ. २१४). हरिजन–चळवळीच्या द्वारा त्यांनीं सदसद्विवेकबुद्धि जागी केली व जगांत दुसऱ्या कोणीहि व्यक्तीनें दलितांसाठीं केले नसतील इतके प्रयत्न केले. हिंदुस्थान-देश गांधींना, त्यांनीं स्वराज्य मिळवून दिलें म्हणून धन्यवाद देईल, परंतु मानवजातीच्या दृष्टीनें हरिजनोद्धार ही त्यांची महान् कामगिरी ठरेल (पृ. २०८).

सत्याग्रहापासून सत्तांतर होणें शक्य नाहीं व सत्याग्रहाचा सरकारी अधिकारी व ब्रिटिश सरकार यांवर प्रत्यक्ष परिणाम फारसा झाला नसला तरी सत्याग्रहानें लोकांच्या मनांतील भीति घालविली व अमेरिकेसारख्या ब्रिटनच्या मित्रराष्ट्राचें हिंदुस्थानांतील ब्रिटिश कारभाराबद्दल कलुषित मत होत गेलें व त्याकडे लक्ष देणें ब्रिटनला भाग पडलें (पृ. १८८–८९). १९३० सालीं हिंदुस्थानांत दोन सरकारें होतीं: एक गांधींचें, दुसरें ब्रिटिशांचें असा आपला अनुभव ब्रेल्सफर्ड यांनीं दिला आहे (पृ. १८०) राजकारणी मुत्सद्द्यापेक्षां धार्मिक व नैतिक क्षेत्रांतील प्रेषित ह्या दृष्टीनेंच ब्रेल्सफर्ड गांधींकडे बघतांना दिसतात. गीतेंतील 'यदा यदा हि धर्मस्य' ही उक्ति मानवतेला संदेश देऊं शकेल अशी गांधीजींची श्रद्धा होती, असें म्हणून ब्रेल्सफर्डनीं आपला भाग संपवला आहे (पृ. २२४).

## 'व्यवहार आणि साधुत्व यांचें अपूर्व मिश्रण'

१९३९ ते गांधीजींच्या मृत्यूपर्यंतचा जीवनवृत्तान्त लॉर्ड पेथिक-लॉरेन्स यांनीं वर्णन केला आहे. गांधीजींची व त्यांची मैत्री अनेक दिवसांची होती. १९२७ च्या गौहत्ती कॉंग्रेसच्या वेळेस ते हिंदुस्थानांत येऊन गांधीजींना भेटले होते. १९४६ च्या त्रिमंत्रिशिष्टमंडळांत ते भारतमंत्री म्हणून आले होते (पृ. २६). स्वतः अधिकारारूढ

## 'महात्मा गांधी'

व्यक्ति असल्यानें ते पोलाक किंवा ब्रेल्सफर्ड यांच्याप्रमाणें मोकळेपणानें लिहूं शकलेले नाहींत. त्यांनीं लिहिलेला वृत्तान्त पार्लमेंटाला सादर केलेल्या अहवालाप्रमाणें भासतो. त्यांत दोन्ही बाजू स्पष्टपणें मांडण्याचा प्रयत्न आहे. हा वृत्तान्त लिहीत असतां स्वतःचें मत देण्याचें पेथिक-लॉरेन्स ह्यांनीं कौशल्यानें टाळल्याचें दिसतें. गांधीजींच्या जीवनतत्त्वांचें मूल्यमापन त्यांनीं शेवटीं एक वेगळें प्रकरण लिहून केलें आहे; येवढाच त्यांनीं लिहिलेल्या चरित्रांतील त्यांचें स्वतःचें मत देणारा महत्त्वाचा भाग आहे.

युद्धविरोध करूनहि फॅसिस्टांच्या पाशवी शक्तीला मान तुकवायची नाहीं, लोकशाही राष्ट्रांना अडथळे निर्माण करावयाचे नाहींत आणि हिंदची स्वातंत्र्यज्योत तर कायम ठेवावयाची अशा तिहेरी पेंचांत गांधीजी होते, असें पेथिक-लॉरेन्स म्हणतात. ह्या जंगलांतून वाट काढण्यास म. गांधींनीं बिकट आत्मक्लेश भोगले (प्र. २२६). गांधीजींच्या मतें अहिंसक प्रतिकार हें केवळ स्वप्नदर्शी तत्त्वज्ञान नसून तो एकमेव व्यवहार्य मार्ग होता. कॉंग्रेसच्या इतर कोणत्याहि सभासदाप्रमाणें कोणतीहि किंमत देऊन ते युद्धसहकार्याला तयार नव्हते (पृष्ठ २४६). क्रिप्स-शिष्टाई व तीनंतर गांधीजींची ब्रिटिश हेतूंबद्दलची वाढती निराशा व ह्या सर्वांचें पर्यवसान 'हिंद छोडो' ह्या चळवळींत झालेलें ह्याचें पुराव्यासहित वर्णन पेथिक-लॉरेन्स करतात व ह्या सर्व गोष्टींवर स्वतःचें मत देण्याचें टाळतात. बंगाल-दुष्काळाबद्दलचा त्यांचा उल्लेख तर फारच त्रोटक, शुष्क व भावनाविरहित वाटतो (पान २५२). जिना-गांधी यांसंबंधींच्या विवेचनांत ते दोघे एकमेकांच्या विरुद्ध होते येवढेंच नव्हे तर त्यांना एकमेकाची बाधा होती, (They were allergic to each other) असें पेथिक-लॉरेन्स म्हणतात (पृ. २५६).

स्वतःचा हात असलेली त्रि-मंत्रि-योजना पेथिक-लॉरेन्सनीं २० व्या प्रकरणांत वर्णन केली आहे. "कल्पना व घटना ह्या दोन ध्रुवांभोंवतीं सर्व विश्वांतील जीवन फिरतें व ह्या दोन्हींमध्यें गांधीजींनीं मोलाची भर घातली आहे. गांधीजींच्या जन्माचे वेळीं वर्गभेद, लिंगभेद व वर्णभेद ह्या तीन शृंखलांनीं मानवी स्वातंत्र्य बद्ध झालें होतें. ह्या तिन्हींचा भंग करण्यांत गांधीजींनीं आपलें जीवन पणाला लावलें (पृ. ६१).

शेवटल्या प्रकरणांत गांधीजींचें जगाच्या इतिहासांतील स्थान कोणतें हें ठरविण्याचा प्रयत्न पेथिक-लॉरेन्स करतात. खिस्त व बुद्ध यांच्याप्रमाणेंच गांधीजींचें ध्येय आपल्या देशबांधवांचें नैतिक पुनरुज्जीवन करणें हें होतें. परंतु इतर आध्यात्मिक गुरु व गांधीजी यांमध्यें फरक म्हणजे गांधीजी हिब्रू प्रेषिताप्रमाणें व्यावहारिक जगाच्या आखाड्यांत उतरले. वकिलाचा व्यवहारवाद व साधुत्व यांचें अपूर्व विचित्र मिश्रण त्यांच्यांत असल्यानें त्यांच्याशीं राजकीय वाटाघाटी करणें अत्यंत अवघड होतें (पृ. ३०५-३०६). गांधीजी हे शांततावादी होते पण केवळ क्रियाशून्य तटस्थतावादी नव्हते. इतिहास गांधीजींच्या ह्या शांततेच्या, अहिंसेच्या प्रयोगाबद्दल काय म्हणेल ? ब्रेल्सफर्डप्रमाणें पेथिक-लॉरेन्सहि म्हणतात कीं, सर्वनाश टाळावयाचा असेल तर गांधीजींच्या अहिंसेचा अवलंब करावा लागेल. पण कोणता देश इतक्या उच्च पातळीवर येईल ? (पृष्ठ ३०९).

राजकारणांत एखाद्या धोरणाचा केवळ व्यावहारिक फायदा त्यांनीं कधींच पाहिला नाहीं. हिंदची विभागणी हीं परमेश्वरी संकेताच्या विरुद्ध आहे हें गांधीजींना वाटत असल्यानें ते परमेश्वरी संदेशासाठीं थांबले होते. सामान्य मनुष्य त्यांना प्रश्न विचारील कीं, 'तुमच्यासारखे महात्मे परमेश्वरी आदेश जाणूं शकतात; पण मला माझ्या कृत्यांचा व्यवहारी संभाव्य परिणामच पाहिला पाहिजे!' गांधीजींकडून ह्या बाबतींत अंतिम उत्तराची अपेक्षा केली तर त्यांची पेटती चिता दिसते! व २००० वर्षांपूर्वीं क्रूस-खांबावरून आलेला संदेश कानीं येतोः "मित्रासाठीं स्वतःचा प्राण देणाऱ्यापेक्षां जास्त प्रेम कोणीहि करूं शकणार नाहीं!" (पृ. ३१२).

—अ. के. भागवत








तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# मार्क्स् व मानसिक संस्कृतीचीं चिरंतन मूल्यें

## मार्क्स्, फ्रॉईड् व शंकराचार्य

मार्क्सवाद असें म्हणतो कीं नैतिक, कलात्मक, वाङ्मयसंबंधी, राजकीय, कायदाविषयक वा तत्त्वज्ञानरूप सर्व मानवी प्रवृत्ती वा व्यवहार यांना आर्थिक जीवनाव्यतिरिक्त अलग असा इतिहास नाहीं. आर्थिक शक्तींचा इतिहास हाच त्यांचा इतिहास आहे. नीति, धर्म, तत्त्वज्ञान, कला वा वाङ्मय या मानसिक विश्वांतील मूलभूत सत्य आर्थिक जीवनच आहे. त्याव्यतिरिक्त बाकी सर्व बाह्य देखावा आहे. यासच मार्क्सचा अर्थाद्वैतवाद असें म्हणतां येईल. एकोणिसाव्या शतकांत त्याच्या योगानें मार्क्सनें जशी विलक्षण भुरळ उत्पन्न केली, तशीच विसाव्या शतकांत मनोविश्लेषणपद्धतीच्या द्वारा फ्रॉइडनें उत्पन्न केली आहे.

मनुष्याच्या जीवनाचें व इतिहासाचें गूढ करतलामलकवत् हस्तगत झाल्याचा आनंद मार्क्सच्या अर्थाद्वैतवादानें आणि फ्रॉइडच्या सर्व प्रवृत्तींची कामात्मकता सांगणाऱ्या मनोविश्लेषणपद्धतीनें अनेक चिकित्सकांना अनुभवावयास मिळाला आहे. याचें कारण असें आहे कीं, वरील तत्त्ववेत्त्यांनीं आपलें तत्त्वज्ञान माणसांच्या नित्य प्रत्ययास येणाऱ्या सामाजिक परिस्थितींत अबाधितपणें विणलेल्या एका वस्तुस्थितीवर उभारलेलें आहे. माणसाच्या प्रत्यक्ष व अपरिहार्य अशा प्राथमिक गरजांशीं जाऊन भिडणाऱ्या अशा या उपपत्ती आहेत. त्यामुळें त्यांचें थोडेसें मनन केल्याबरोबरच सर्व जीवनांगावर प्रकाश पडल्यासारखा वाटतो; इतिहासाचा कार्यकारणभाव हातीं आल्यासारखा वाटतो. इतिहास हा क्रमबद्ध असतो. क्रमबद्धता हेंच इतिहासत्व होय. क्रमबद्धतेच्या अंतरंगांत कार्यकारणभाव दडलेला असतो. कार्यकारणभाव सिद्ध करणें हें इतिहासशास्त्रांतलें अत्यंत अवघड काम आहे. हें अघवड काम सुलभ झालें आहे, असें आश्वासन मार्क्सनें व फ्रॉइडनें दिल्यामुळें त्यांची छाप फार व्यापक प्रमाणांत अर्वाचीन जगावर पडली आहे. त्यांच्या मननानें मद्यसदृश मद अनुभवास येतो; अनेक व्यक्ती त्यामुळें बेहोषही होतात.

प्राचीन इतिहासांत शंकराचार्यांचा मायावाद व बुद्धाचा क्षणभंगवाद यांनीं असाच अंमल गाजविला होता. इंद्रियांचा भ्रम व अज्ञान हा माणसांच्या नित्य अनुभवाचा भाग आहे. उदाहरणार्थ, पृथ्वीपेक्षां अगणित पटींनीं मोठे असलेले तारे डोळ्याला जाईच्या फुलांएवढे दिसतात; कांचेची अंतर्गोल वा बहिर्गोल रचना बदलली कीं त्यांतून पहातांना वस्तूंचे नेहमीं माहित असलेले आकार उलटे दिसूं लागतात; वरून सुंदर दिसणारें शरीर अदृश्य अशा सूक्ष्म रोगजंतूंनीं भयानक व कुरूप बनतें; पण त्याचा अर्थ लवकर उमगत नाहीं. पौष्टिक भरपूर स्वादु आहारानेंही व्याधी कशा उत्पन्न होतात, हें फार थोड्यांना कळतें. अशा प्रकारें विपरीत ग्रह, लोकभ्रम, अनेक प्रकारच्या गैरसमजुती आणि सृष्टिविषयक अज्ञान यांच्यामुळें मनुष्यांना वैयक्तिक व सामाजिक आपत्ती भोगाव्या लागतात. त्यांच्यामुळेंच चिंता व दुःख माणसाचा नित्य पाठलाग करीत असतें. शंकराचार्यांनीं याच प्रकारच्या अज्ञानाचा, भ्रमांचा व तज्जन्य दुःखांचा आधार घेऊन मायावादाची मांडणी केली. मायावादाचा उगम गौतमबुद्धांत झाला; आणि त्याची चतुरस्र सिद्धि शंकराचार्यांनीं केली. हिंदुस्थान व अनेक सुसंस्कृत देश या विचारसरणीच्या प्रभावाखालीं अनेक शतकें राहिले. मायावाद अजूनही पाश्चात्य व पौर्वात्य विचार-



अनुक्रमणिका






वंतांच्या विचारक्षेत्रांत तग धरून राहिला आहे. तात्पर्य, जी जी विचारसरणी सामान्य माणसांच्या सामान्य प्रतीतीस येणाऱ्या वस्तुस्थितीला प्राधान्य देते, ती ती प्रचारदृष्ट्या विस्मयजनक यश प्राप्त करून घेते. याच कारणास्तव मार्क्सवाद इतका विजयी झाला आहे.

## आर्थिक व्यवहार व मानसिक संस्कृति संबद्ध पण पृथक्

आर्थिक इतिहास व मानसिक इतिहास हे अक-मेकांत गुंतलेले आहेत, हें जरी खरें असलें तरी त्यांचें पृथक्त्व मान्य करावेंच लागतें. पदार्थांचे रूप, रस, गंध इत्यादि गुण एकमेकापासून अलग करतां आले नाहींत, तरी त्यांचें भिन्नत्व मान्यच करावें लागतें. हीच गोष्ट आर्थिक संस्कृति व मानसिक संस्कृति यांना लागू आहे. गणिताच्या इतिहासाची उपपत्ति आर्थिक घडामोडींच्या व संशोधनाच्या इतिहासानें अधिक चांगली समजते. किंबहुना, गणितकल्पनांच्या कांहीं शोधांचा प्रत्यक्ष आर्थिक संबंध इतिहासांत अनेक उदाहरणांनीं चांगला पटवितां येतो. ग्रीकांचें भूमितिशास्त्र इजिप्तच्या पिरॅमिड्समधून उगम पावलें आहे, असें लॅन्सलॉट हॉग्बेन यानें सिद्ध केलें आहे. परंतु गणितकल्पना आपसांत अशा रीतीनें निगडित आहेत कीं त्यांचा स्वयंपूर्ण विकास कसलाहि बाह्य संबंध न दाखवितां सिद्ध करतां येतो. कोठेंहि यत्किंचितहि दुवा अलग न करतां त्या गणिती विचारांची अखंड माला बुद्धीला समाधीचा आनंद प्राप्त करून देते. गणितविषयक विचारांचा विकास म्हणजे विचारांची अबाधितपणें होणारी तार्किक परिणति होय. एक विचार दुसऱ्या विचारांतून अनिवार्यपणें उद्भव पावतो, असा तो विकास आहे. आर्थिक पार्श्वभूमि ध्यानांत न घेतांच अथपासून इतिपर्यंत गणितकल्पनांची वाढ संपूर्णपणें समजून येते. उलट गणितकल्पना वगळा; आर्थिक इतिहास त्यामुळें केवळ अंधारमय होईल! मोजमाप केल्याशिवाय बाह्य जगाशीं मनुष्याचीं इंद्रियें व्यवहारच करूं शकत नाहींत. बाह्य जगाशीं चाललेला माणसाचा सर्व व्यवहार मोजमापाच्या जाणीवेनें परिपूत झाला आहे 'दृष्टिपूतं न्यसेत् पादं' असें व्यासानें म्हटलें आहे. दृष्टीनें पावन वा शोधन केल्याशिवाय पाऊल टाकूं नये. दृष्टीनें पावन करणें म्हणजे मोजणें. अंधारांत दृष्टीनें मोजतां येत नाहीं, म्हणून पाय खोलांत जातो.

## कालमर्यादित मूल्यें व चिरंतन मूल्यें

जाणीव व जीवन यांची मानवी व्यवहारांत विभक्तता दाखवितां येत नाहीं. नीति, धर्म, कायदा, कला, विज्ञान व तत्त्वज्ञान या जाणिवेच्या स्वरूपांना आर्थिक व्यवहारांपेक्षां दुय्यम व गौण समजून व आर्थिक व्यवहारास मूलभूत सत्य मानून मार्क्सनें इतिहासाचें रहस्य सांगण्याचा प्रयत्न केला; जाणीवेच्या वरील स्वरूपांना आर्थिक शक्तींशीं सापेक्षपणें बांधून टाकलें. सर्व जीवनमूल्यें त्या त्या आर्थिक युगापुरतींच खरीं होत; युग बदललें कीं तीं बदलतात; शाश्वत वा चिरस्थायी मूल्यें हा केवळ आभास आहे असें मार्क्सवाद ठासून सांगतो. परंतु वैज्ञानिक पद्धतीच्या दृष्टीनें या सापेक्षतावादांत एक महत्त्वाचा दोष शिरला आहे. सर्वच मूल्यें अर्थयुगाशीं सापेक्ष असतात, हें विधान अतिव्याप्तिदुष्ट आहे. कोणतीं मूल्यें विशिष्ट युगापुरतीं मर्यादित व कोणतीं अनेक युगांना व्यापणारीं, हें नीट तपासलें पाहिजे. गणित, विज्ञान, तर्कशास्त्र इत्यादिकांतील अनेक शोध युगानुयुगें टिकले आहेत. दशांक-पद्धति, शून्याची कल्पना, बीजगणित, अनुमानपद्धति, वाक्यसंगतींचे नियम हे कल्पांतापर्यंत अबाधित राहतील असें दिसतें. तसेंच इंद्रियनिग्रह, चित्तशुद्धि, सर्वभूतानुकंपा, समत्वबुद्धि इत्यादि धार्मिक वा नैतिक मूल्यें मनुष्यजातीच्या अंतिम मर्यादेपर्यंत टिकतील असें मानण्यास पुष्कळ आधार आहे. सृष्टीच्या व मनुष्यसमाजाच्या इतिहासांत त्या त्या कालानें मर्यादित किंवा अनेक युगें स्थिर रहाणारीं अशीं मूल्यें—पदार्थ, जाति, आकार, वा गुण —— विशिष्ट कालखंडांतील अनुकूल परिस्थितीमुळें निर्माण होतात. नंतर उत्पन्न होणाऱ्या कालखंडांत त्यांची परंपरा चालू रहाते. माणूस हा प्राणी मर्कटसदृश प्राण्यांतून उत्क्रांत पावला, असें म्हणतात. ती उत्क्रांति एका विशिष्ट कालखंडांतच झाली; अलीकडे हजारों वर्षें ती बंद पडली आहे. एकदां विकास पावून निष्पन्न झालेलें मानवरूपी मूल्य आपली परंपरा युगानुयुगें चालवीत








आहे. अजीव स्थितींतून जीवस्थिति उत्पन्न होण्याचा एक काल होता. त्या काळाचा आतां मागमूसही नाहीं. पण काळाची जीवरूपी देणगी सृष्टीनें राखून ठेविली आहे. अजीव युगांत तयार झालेलीं भूगर्भांतील रत्नें, वनस्पतियुगांतलि कमळें, मानवपूर्व प्राणियुगांतील हंसकारंडव यांचे परिणत व पूर्ण असे आकार विकासाच्या व मूल्यांच्या अंतिम व चिरंजीव सीमा दाखवितात. पूर्ण परिणत झालेले व पूर्णतेची परिसीमा गांठणारे सृष्ट पदार्थ सर्व युगांत स्पृहणीय ठरतात. तसेंच आध्यात्मिक किंवा मानसिक मूल्यांचें असतें.

## कलेचा 'कच्चा माल' कालमर्यादित, कला नव्हे

धार्मिक संस्कृतींत कल्पित कथा आणि कर्मकांडयांच्या चमत्काराबद्दल अंधविश्वास जन्मतो. या कल्पितकथा व धार्मिक कर्मांची जादू भ्रांतिपूर्ण असली तरी त्यांतून स्थापत्य, मूर्तिकला व काव्यें निर्माण होतात. कल्पित पुराणकथा आणि कर्मकांडाची जादू यांच्यावरील विश्वास पूर्णपणें नष्ट झाल्यानंतरदेखील त्यांच्यांतून निर्माण झालेल्या कलेची व काव्याची रम्यता वा सुभगता कायम रहाते. कलेचा 'कच्चा माल' धर्मभ्रांतीनें पुरविलेला असतो. परंतु कलेला ती भ्रांति बाधत नाहीं. प्रतिभा, सूक्ष्म अनुभूति आणि विश्वचिंतन यांच्या संगमानें विशाल कला प्राचीन धर्मयुगानें जन्मास घातली. ती त्या आर्थिक युगांना उल्लंघूनहि आज तितकीच सतेज व रमणीय राहिली आहे.

कलेच्या मुद्द्यावर मार्क्स अगदीं गोंधळून गेला आहे. तो म्हणतो कीं, ग्रीक लोकांच्यापेक्षां आजचें जग कितीतरी पटीनें सुधारलें आहे. परंतु या आजच्या जगांतील लोकांना ग्रीक लोकांसारखी मूर्तिकला साधत नाहीं. आर्थिक दृष्ट्या अत्यंत मागें असलेल्या ग्रीकांनीं निर्मिलेली ॲपोलोची वा व्हीनसची मूर्ति आजच्या सुधारणेच्या शिखरावरील माणसास मंत्रमुग्ध करते. आर्थिक युगविकासाशीं सापेक्ष असाच मानसविकास असतो, हा सिद्धांत या ठिकाणीं मार्गदर्शक होत नाहीं. प्रौढ माणसास बालक उचलून कडेवर घ्यावेसें वाटतें, तसेंच आजच्या प्रौढ जगाला ग्रीक कलेच्या तरतरीत बालिकेला उचलून घ्यावेसें वाटतें, असें मार्क्स सांगतो. या उत्तरांत मार्क्स मोठी हातचलाखी दाखवितो. परंतु तार्किक समीक्षकाची त्यामुळें फसगत होऊं शकत नाहीं. बालकाच्या दृष्टांतांत बाल्य हें माणसाच्या दृष्टीनें चिरंतन मूल्य आहे. मानवसृष्टीच्या आद्यंतांना नाजूकपणें वेढून असलेला वात्सल्य हा भाव या दृष्टांतांत गृहीत धरलेला आहे. इतिहासवादांत बाल्य हा शब्द शाश्वत मूल्य असलेल्या बाल्याचा व वात्सल्याचा दर्शक नाहीं; तो विकासाच्या क्रमांतील नष्ट झालेल्या अतिप्राचीन कालाचा बोधक आहे. मार्क्स हा या मुद्द्यावर हतबुद्ध झाला आहे. दृष्टांतानें तो स्वतःची आत्मवंचना करीत आहे.

कलेची सर्वानुभूत चिरंतनता मार्क्सच्या ऐतिहासिक भौतिकवादाच्या विनाशकल्पनेशीं जुळत नाहीं. पूर्वयुगांतील चिरंतन मूल्यांचा वारसा कसा असतो व त्याची प्राप्ति उत्तरोत्तर युगांना कशी होते, याची उपपत्ति वर सांगितल्याप्रमाणेंच मानली पाहिजे. देशकालानें मर्यादित असणारी संस्कृतीची बाजू आणि देशकालाच्या मर्यादांना भेदून जाणारीं संस्कृतीचीं चिरंतन रूपें यांचा बेमालूम संगम झालेला असतो; त्यामुळें इतिहासवादी हा संभ्रमांत पडतो. सहा हजार वर्षांच्या पलीकडची उषेची वैदिक कविता आपल्या सुकुमार स्मितानें एकोणिसाव्या शतकांतील इंग्लिश निसर्गकवितेशीं इतक्या अंतरावरूनही हातमिळवणी करीत असते. पितृप्रधान प्राचीन संस्कृतींतील पितृनिष्ठेवर आधारलेलें रामायण—महाकाव्य आज ती निष्ठा दुय्यम पदाला प्राप्त झाल्यानंतरही मनाला कारुण्यानें सद्‌गदित करते. बायबलमधील सृष्टिरचनेची कल्पना आतां संपूर्णपणें मिथ्या ठरली आहे, याबद्दल कोणत्याही युरोपियन सुशिक्षित मनुष्याच्या मनांत शंका उरली नाहीं; तरी डॉटेचें 'दिव्य आनंदसाम्राज्य' (Divine Comedy) हें महाकाव्य युरोपियन सुशिक्षितांच्या मनाला उदात्त भावनेनें भारून टाकतें. पंधराव्या शतकांतील अप्रतिम स्थापत्यकार व चित्रकार मायकेल ॲंजेलो यानें ख्रिश्चन पुराणकथांच्या आधारें फ्लॉरेन्स येथें पूजामंदिरें उभारलीं व त्यांत चित्रें कोरलीं. त्यांच्या दर्शनानें मनुष्याच्या हृदयांत ईश्वरी कृतीच्या भव्य भावना आजही उदय पावल्याशिवाय रहात नाहींत.










अनुक्रमणिका

आदमच्या शरीरांत ईश्वर अंगुलि-स्पर्शानें प्राणप्रेरणा उत्पन्न करतो, असें चित्र मायकेलनें निर्माण केलें आहे. तें पाहिल्याबरोबर अचेतन हें सचेतन केव्हां होईल याचा भरंवसा नाहीं, असें चाकितपणें वाटूं लागतें. मायकेल अँजेलोची कला आपला जबरदस्त प्रभाव आजही दाखविते. तें तें सामाजिक युग कलेला 'कच्चा माल' पुरवितें. त्या त्या विशिष्ट देश-कालांतील चालीरीती, आहारविहाराच्या विशिष्ट पद्धती, पोषाक, समजुती व गैरसमजुती इत्यादि गोष्टी हा कलेचा कच्चा माल होय. परंतु त्या मालानें निर्माण केलेली ललितकला तो काळ पूर्ण बदलल्या-नंतरहि रमणीयतेचा, मोहकतेचा किंवा सरसतेचा त्याग करीत नाहीं; म्हणूनच शाकुंतलाचा अजब परिणाम गोएटेच्या मनावर झाला. म्हणून असें म्हणावें लागतें कीं, मनुष्य हा एकसमयावच्छेदेंकरून तिन्ही कालांत रहाणारा व रमणारा प्राणी आहे. त्या त्या परिस्थितीत पूर्णता पावलेलीं रूपें व आकार दीर्घकालपर्यंत रमणीयच राहतात. दूरचा देश, लांबचा काल, भिन्न व्यक्ति व स्वतःच्या परिस्थितीपेक्षां अन्य परिस्थिति यांच्याशीं तन्मय होऊनच कलानिर्मिति वा कलास्वाद निर्माण होऊं शकतो.

## वस्तूंतील चिर व अचिर भाव

जाणीव संनिकृष्ट वस्तूंचेंच प्रतिबिंब घेतें, हें खरें आहे. परंतु संनिकृष्ट वस्तूंत क्षणिक व चिरस्थायी असे दोन प्रकारचे भाव एकरूपणें समावलेले असतात. चिरस्थायी भावाचें विशद प्रतिबिंब जेव्हां बुद्धीत पडतें, तेव्हां शास्त्रीय सत्य सांपडलें असें म्हणतात. तीं सत्यें चिरंजीव असतात, या भरंवशावरच खरोखर शास्त्रांची व कलांची प्रगति होऊं शकते. युगें बदललीं, तरी सत्यें माणसाला प्रगतीचें आश्वासन देत माणसाची साथ करीत असतात. त्यांची पारख मात्र नव्या नव्या अनुभवांनीं सारखी करावी लागते. कारण अज्ञान आणि भ्रम यांचा धोका कोठें आहे, असेल, याचा नेम नसतो. म्हणून चिकित्सेचा डोळस पहारा ठेवावा लागतो. श्रद्धा धीर देत असते व चिकित्सा सावध ठेवीत असते. मार्क्सचा सापेक्षतावाद या सावधपणाला मदत करतो. सामाजिक युग बदललें म्हणजे नवे अनुभव व नवीं तत्त्वें प्राप्त होऊं लागतात. त्यांच्या योगानें परंपरागत संस्कृतीचें पुनःसंशोधन करण्यास आवश्यक अशा साधनांचा लाभ होतो. परंतु युग बदललें म्हणून किंवा युग बदलावयाचें म्हणून परंपरेचा संपूर्ण त्याग करणें यांत मोठा धोका आहे. स्नानपात्रांतील पाण्या-बरोबरच लहान बालकहि फेंकून देणाऱ्या वेडपट शुश्रूषकाप्रमाणें अविवेकीपणा त्यामुळें पदरीं येतो.

वस्तुतः कोणत्याही सांस्कृतिक मूल्याची तपासणी करतांना त्या त्या विषयाचें तर्कशास्त्र वापरलें पाहिजे. भांडवलदारी हितसंबंधाचा दोष, मनोविकृति, न्यूनगंड, इत्यादि गूढ कारणें दाखवून कोणत्याहि मूल्याचा आधिक्षेप करणें फार सोपें आहे. परंतु त्यामुळें खरें मूल्यमापन होऊं शकत नाहीं. शास्त्राचा निर्णय अथवा सिद्धान्त हा बरोबर कीं चूक हें तार्किक कसोटीवरच ठरवितां येतें. वर्गस्वार्थ किंवा मनोविकृति ज्याच्या ठिकाणीं असते, त्याला त्यांची बाधा प्रतिक्षणीं होतेच, असें नसतें. गुन्हेगार नित्य गुन्हेगार नसतो. महापातकी सुद्धां साधूंना मान डोलावयास लावणारें सत्कर्म शुद्धबुद्धीनेंही करूं शकतो. दुसरें असें कीं, कोणतेंही विधान वर्गस्वार्थमूलक, मनोविकृतिमूलक किंवा सामाजिक परंपरेच्या अभिमानानें केलेलें आहे, असें सिद्ध झालें तरी तें त्यामुळें चूक आहे, असें नक्की म्हणतां येत नाहीं. न्यायालयांत भांडणारे वादी व प्रतिवादी स्वार्थप्रेरित होऊनच भांडत असतात. त्यांच्यापैकीं एकाचें म्हणणें खरें असतें. संत जोन ऑफ आर्कच्या अंगांत संचार होत असे; म्हणजे तिला मनोविकृतीची बाधा होती; परंतु तिला फ्रान्सची न्याय्य बाजू अधिक चांगली समजली होती. महात्मा गांधींना व रवींद्रनाथ टागोरांना हिंदी संस्कृतीच्या परंपरेचा अभिमान होता; परंतु त्यामुळें हिंदी राजकारणाचें मर्म उत्कृष्ट रीतीनें समजण्यास त्यांना प्रत्यवाय आला नाहीं. तिसरें असें कीं, वर्गाहंकाराची बाधा, मनोगंडाची पीडा अथवा सामाजिक परंपरेच्या अभिनिवेशाची व्यथा यांचीं तर्कशास्त्रें दुधारी शस्त्रांसारखीं उभय-घातक आहेत. कारण जो तीं शस्त्रें वापरतो, त्याच्यांतही वर्गाहंकार, मनोगंड व सामाजिक परंपरेचा दोष दाखविणें सुलभ आहे. म्हणून तीं शस्त्रें फार सावधपणें वापरलीं पाहिजेत.







प्रा. ना. अ. गोरे

# एक लोकगीत

'पुस्तकी शिक्षण न लाभलेल्या समाजाच्या लोकगीतांचा अभ्यास हा सामाजिक व सांस्कृतिक इतिहासाचें एक महत्त्वाचें साधन आहे. शालेय शिक्षणाला पारखे झालेल्या लोकसमूहाच्या करमणुकी, आशा-आकांक्षा, रीतीभाती, त्यांची विचारसरणी लोकगीतांवरून चांगल्या प्रकारें समजून येतात. केवळ लोकगीतेंच नव्हे तर लोकांच्या तोंडीं असलेल्या परंपरागत परंतु ग्रंथनिविष्ट न झालेल्या अशा कहाण्या, म्हणी, उखाणे, गोष्टी, आख्यायिका, पोवाडे, लावण्या, ओंव्या इत्यादि सर्व प्रकारच्या लोकसाहित्याचा संग्रह व अध्ययन पद्धतशीरपणें व साकल्यानें करावयाच्या योजना आंखल्या जावयाला हव्यात. ओंव्या, लोककथा, लोकगीतें संकलित करण्याचे वैयक्तिक प्रयत्न श्री. सानेगुरुजी, श्री. दाते, श्री. जोशी, श्रीमती कमळाबाई देशपांडे इत्यादींनीं केले आहेत. पण सर्व प्रकारचें एकूण उपलब्ध लोकवाङ्मय संग्रहीत करावयाला याहून व्यापक प्रमाणांत प्रयत्न होणें अवश्य आहे.

पुढें दिलेलें लोकगीत प्रा. मॅक्‌मिलन् यांच्या एका स्नेह्यानें १९०३ च्या सुमारास माथेरानच्या कोळ्यांच्या तोंडून ऐकलें व त्यांत बोंबे (मुंबई) चा उल्लेख असल्यानें त्यांनीं मुद्दाम स्मरण ठेवून प्रा. मॅक्मिलन् यांना ही गोष्ट सांगितली. प्राध्यापकांनीं तें संपूर्ण गीत मिळवून रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलच्या २१ व्या पुस्तकाच्या एका अंकांत तें रोमन अक्षरांत छापविलें आहे व त्याचा इंग्रजी अर्थहि सोबत दिला आहे. या पूर्वी तें देवनागरी लिपींत छापून प्रसिद्ध झालेलें नसल्यानें मीं तें पुढें देत आहे. एक कोळीण, मुंबईची नवरी आपल्या मुलाला करून दिल्यानें आपल्या घराण्याला जास्त प्रतिष्ठितपणा लाभेल, अशा समजुतीनेंच बहुधा मुंबईची मुलगी करून घेण्याचा मुलास आग्रह करीत आहे. उलट मुंबईच्या मुली भारी खर्चिक हें कारण दाखवून मुलगा मुंबईची मुलगी पत्करावयाला कबूल होत नाहीं. पण मुलीच्या चैनबाजीची तक्रार ही केवळ एक सबब होती. त्याच्या गांवच्याच जिंगी नांवाच्या मुलीवर त्याचा जीव जडला होता. आपलें न ऐकल्यास सरकारी कोठडींत डांबून ठेवण्याचा धाक आईनें घालतांच घरांतून पळून जाईन अशी उलट धमकी द्यावयाला तो भीत नाहीं. शेवटीं या मायलेकरांच्या भांडणाचा निकाल काय झाला तें हें लोकगीत सांगत नाहीं. पण सरकारी कोठडी राहिली दूर, उलट मुलाच्या पायाच्या चपळाईनें शेवटीं त्यालाच जय मिळवून दिला असेल याची शंका वाटत नाहीं!

लेका, बोंबेची नवरी करून देईन तुला।
घोडयाच्या गाडीमध्यें नेईन तुला ॥ १ ॥

बोंबेची बर्फी पाहिजे तिला।
अमदाबादी लुगडें ती मागेल मला ॥ २ ॥

जरीची चोळी आतां कुठून आणूं तिला।
बोंबेची बायको नको गे मला ॥ ३ ॥

चार दोडयाची पानसुपारी मागते खायाला।
लेका खाशिल[1] कां ? नाहीं तो, मारिन तुला ॥ ४ ॥

सरकारी कोठरीमध्यें घालिन् तुला।
आई, जिंगी बायको करून दे गे मला ॥ ५ ॥

न करशील तर आई, पळून जाईन देशाला।
बोंबेची बायको नको गे मला ॥ ६ ॥

चार दोड्याची पानसुपारी मागते खायाला।
लेका, चार पैसे देईन तुला ॥ ७ ॥

खर्चायला पानसुपारिला।
तळ्यावर मळ्यावर नेईन तुला ॥ ८ ॥

जांबूळ पेरू चारिन् तुला।
खुर्ची-टेबलावर बसवीन् तुला ॥ ९ ॥

बोंबेची बायको नको गे मला।
चार दोड्यांची पानसुपारी मागते खायाला ॥ १० ॥

---

१ 'खाशिल' हें 'खळशिल' ( = थांबशील ) चें वृत्तासाठीं केलेलें संक्षिप्त रूप असावें. 'असें बोलावयाचें थांबतोस का नाहीं ? नाहीतर तुला मार देईन' असें आई म्हणते.








## सारसंकलन

### " प्रज्ञामूर्ति गेऽटे "

जर्मन महाकवि गेऽटेची २०० वी जयंती ता. २८ ऑगस्टला साजरी झाली. त्या निमित्तानें " संस्कृति " मासिकाचे रसिक संपादक कविवर्य उमाशंकर जोशी यांनीं जो लेख लिहिला आहे तो अत्यंत मननीय आणि रहस्योद्ग्राही वाटल्यावरून त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें देत आहों:

" मानवजातीनें जीं कांहीं थोडीं कविरत्नें निर्मिलीं त्यांत जर्मन कवि गेऽटेची गणना होते. ज्या कवींचा जीवनवृत्तान्त आपणांला उपलब्ध आहे त्यांत गेऽटेएवढें विविध अनुभवांनीं समृद्ध झालेलें जीवन कोणाचें क्वचितच असेल: ८३ वर्षांचें दीर्घ आयुष्य, चांगल्या प्रकारची शारीरिक शक्ति, कुशाग्र बुद्धि, अत्यंत कुशलसंज्ञ भावतंत्र, ज्ञानाची अदम्य पिपासा, राजपुरुष म्हणून मिळालेला अधिकार, देश-परदेशच्या काव्यजीवनांत रंगून जाण्याची शक्ति, विशाल-उदार असें मानव्यप्रेम, आणि या सर्वांना वाचा देणारें समर्थ शब्दप्रभुत्व. १९ व्या शतकांतील उत्तम काव्यग्रंथ निर्मिण्यास ह्या शक्ती कमी नव्हत्या; एवढेंच नव्हे तर ज्याप्रमाणें डँटेनें आपापल्या काळापर्यंतच्या (१२ व्या शतकापर्यंतच्या) युरोपच्या ज्ञानभांडाराचा आपल्या काव्यांत (' डिव्हाइन् . कॉमेडी 'मध्यें ) उपयोग केला त्याप्रमाणेंच केवळ १९ व्या शतकापर्यंतच्या युरोपच्याच नव्हे तर पूर्वेकडील देशांच्याहि ज्ञानाच्या वारशानें काव्य भरून टाकण्याची भावना त्याच्यांत होती. गेऽटे खरोखरच एक ' प्रचंड मनोघटनाशाली ' पुरुष होता.

" या महान् कवीच्या क्षर जीवनाची धन्यता कित्येकांच्या मनांत आदर उत्पन्न करते तर कित्येक त्याकडे दोषदृष्टीनेंहि पाहतात. एक दरबारी गुलाम, रूढिग्रस्त, प्रतिगामी—अशा प्रकारेंहि गेऽटेचें वर्णन केलें जातें. पण वायमारच्या ड्यूकनें केव्हांहि गेऽटेला गुलाम लेखावें असा क्षुद्र किंवा पामर गेऽटे मुळींच नव्हता. जुन्या परंपरेंतलि जें जें उत्तम त्याचा तो निःसंशय उपासक होता. आयुष्यभर तो शिकतच होता. ग्रीसचा वारसा पचविण्यांत त्याला कृतार्थता वाटली. शेक्सपीअरला युरोपांत लोकप्रिय आणि विद्वन्मान्य करण्यांत गेऽटेचा मोठा हिस्सा होता. कालिदासाच्या ' शाकुन्तला 'चें त्याचें रसदर्शनच पाहा ना! जेथें जेथें सौन्दर्याची रेखा त्याला दिसली, सुसंस्कृततेचा स्पर्श दिसला तेथें तेथें त्याला नाचावेसें वाटलें! ' शाकुन्तल ' तर खरोखरच डोक्यावर घेऊन तो नाचला होता म्हणतात! पण त्यामुळें कांहीं तो रूढिप्रिय होता असें नाहीं. समकालीन जीवनात त्याला जिवंत गोडी वाटे. एकरमनचे वार्तालाप आणि ' फाउस्ट 'च्या शेवटीं कसण्यासाठीं अधिक जमीन मिळविल्याचें जें दृश्य आहे त्यावरून या गोष्टीची प्रतीति येते. मात्र त्याची सर्वंकष मानवता ' अतीता 'चा इन्कार करींत नव्हती. फ्रेंच क्रांतीबद्दलचें त्याचें वळण धिक्काराचें नव्हतें, पण नावडीचें मात्र होतें. गेऽटेच्या विश्वबंधुत्वावरहि टीका केली जाते. तो सर्वांचा मित्र होता, जर्मनांचाच नव्हे... आपण असें म्हणूं या कीं देशप्रेमांत थोडी उणीव दाखवूनहि शेवटीं त्यानें एक उच्च आदर्शवादी—विश्वबंधु—म्हणून आजीवन स्थिर राहून आपल्या देशाचें नांव उजळविलेंच आहे.

" ... गेऽटे म्हणजे भावनांचा ज्वालामुखी. पण अहोरात्र जागृतपणें स्वतःला संयमांत ठेवून त्यानें आपल्या शक्तीला महान् सर्जनकार्याकडे वळवलें. टॉल्स्टॉयच्या वासनांचें बलहि

अपरिमित होतें व म्हणून आत्मसंयमनाचा महिमा गातांना तोहि कधीं थकत नाहीं. त्यांत्री एक सुंदर उपमा आहे. एकटी वाफ ही कांहीं एकादी मोठी शक्ति नव्हे, पण लोखंडाच्या पेटींत तिला बंद केली म्हणजे तीं मोठी आगगाडी ओढूं शकते. गेऽटेनें हें लोखंडी नियमन आपल्यापुरतें सिद्ध केलें होतें असें म्हटलें पाहिजे...

" त्याच्या या विशिष्ट हृदयघटनेमुळें जास्तींत जास्त त्रास झाला असेल तर गेऽटेला स्वतःलाच. जीवनवीणेच्या तारा तुटत जाव्या आणि त्या फिरफिरून सांधवाव्या लागाव्या अशी भावनांच्या वावटळींत झपाटलेल्या या कवीची दशा होती. त्यानें कोठेंसें लिहिलें आहे त्याप्रमाणें सबंध आयुष्यांत त्याला लाभलेल्या सुखाच्या घटकांची बेरीज केली तर कसेबसे चार दिवसहि भरतील न भरतील! पण गेऽटेनें अन्य ठिकाणीं वापरलेले शब्द योजून आपल्याला असें म्हणतां येईल कीं गेऽटे हा असा कवि होता, '.जो आपला स्वतःचा शोक शांत करून टाकतो आणि आपल्याजवळच्या इतरांच्या शोकाचें सान्त्वन करण्याची व इतरांचा आनंद वाढविण्याची संधि सक्रियपणें शोधीत असतो '! जीवनाची अशी कृतकृत्यता गेऽटेनें आपल्या बहुमूल्य काव्यनिर्मितीच्या द्वारें व त्यांतहि विशेषतः तीच भावना मूर्तिमंत उभी करणाऱ्या ' फाउस्ट ' मधील मुख्य पात्राच्या ( फाउस्टच्या ) द्वारें सिद्ध केली आहे.

" कर्मयोग—अविरत कर्मयोग—हा फाउस्टचा संदेश आहे. जो प्रयत्नशील असेल, तो पडतझडत कां होईना पण शेवटीं आपल्या मुक्कामाला पोंचणारच. मध्यंतरीं किती चुका केल्या, पतनें झालीं हा मोठा प्रश्न नाहीं; मनुष्य परत उभा राहतो आणि फिरून मजल मारूं लागतो. ही त्याची आपलें स्वास्थ्य फिरून मिळविण्याची (Recovery ची) शक्तिच महत्त्वाची होय. सतत प्रयत्न करीत राहतो तो माणूस अंतीं जीवनसाफल्य प्राप्त करतोच.

" गेऽटेची प्रतिभा मुख्यतः टागोरांप्रमाणेंच भावकवींची होती...तो सृष्टीचा उपासक होता. सृष्टींत त्याला प्रभूचें दर्शन घडे. विज्ञानांचा त्याचा व्यासंग खोल होता; पानाचा शेवट फुलांत तसा कोट्यावधि रज्जूंचा मेंदूत—हा गेऽटेनें दिलेला विचार आहे. गेऽटेचा ध्यानमंत्र असा आहे :

वांछिसि गाति जरि तव तूं अनंतीं,
सर्वांगें तरी प्रवेश तूं सान्तीं ।

आजच्या एका प्रमुख तत्त्वज्ञानें—आल्बर्ट स्वित्झरनें—नुकतेंच आपल्या फ्रॅंकफुर्टच्या भाषणांत म्हटल्याप्रमाणें ' गेऽटेच्या व्यक्तित्वाची अचल—तात्त्विक बैठक जर कोणती असेल तर ती त्याची सरलतेनें भरलेली सहृदयता होय. ' "

## मध्ययुगीन संतांची साधना

" सत्यकथा " मासिकाच्या ऑगस्ट १९४९ च्या अंकांत मध्ययुगीन ( मुस्लिम ) संत दादू याचेबद्दल एक विचारप्रवर्तक लेख प्रसिद्ध झाला आहे. प्रख्यात संतसाहित्यकोविद आचार्य क्षितिमोहन सेनांच्या " दादू " नामक बंगाली बृहद्ग्रंथावरून तो श्री. जयंतीलाल आचार्य यांनीं गुजराथींत लिहिला त्याचाच हा श्री. ना. ग. जोशीकृत अनुवाद होय. संतांच्या साधनेची यथार्थ कल्पना देणारे पुढील भाग मननीय आहेत. त्यांतील एकांत रवींद्रनाथांचाही एक उतारा आहे.

" विश्वसंस्कृतीच्या या ( संतसंस्कृति— ) परंपरेंत भारतवर्षाच्या साधनेचा वारसा अमोल आहे. थेट प्रागैतिहासिक काळापासून आजपर्यंत हा प्रवाह अखंड रूपानें गुप्तपणें वाहत आला आहे आणि त्यांतून अमृतपान करून विद्वान्, अशिक्षित, स्त्री, पुरुष, बाल, वृद्ध सर्वांनीं तृप्ति अनुभविली आहे. रवीन्द्रनाथांनीं म्हटल्याप्रमाणें ' जर आपण भारताच्या या आंतरिक साधनेचें प्रवाही रूप स्पष्टपणें पाहूं शकलों असतों तर भारताचा प्राणवान् इतिहास कोठें भरून राहिलेला आहे तें आपणांला कळलें असतें. आणि मग आपणांला कळलें असतें कीं, भारतवर्ष युगानुयुगें कोठल्या लक्ष्याकडे जात आहे आणि तें लक्ष्य प्राप्त करण्याच्या बाबतींत त्यानें किती सिद्धि मिळविली आहे. ' आणखी ते म्हणतात : ' भारताची एक प्रकारची स्वतःची अशी साधना आहे. आणि ती आपली आंतरिक वस्तु आहे. हर प्रकारच्या राष्ट्रव्यापी आंदोलनांतही तो प्रवाह राहिला आहे. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, हा प्रवाह कोणत्याहि शास्त्रीय मताच्या तटबंधांनीं बांधला गेला नाहीं...



अनुक्रमणिका






त्याचें मूळ समग्र जनतेच्या अंगतरंगांत होतें. विधि-निषेधांचें कठीण थर भेदून तो प्रवाह सहजपणें प्रगट झाला होता. ज्यांच्या मनोभूमींत हा झरा उमटला होता, त्यांपैकीं बरेचसे सामान्य कोटीचे मानव होते.'

"संतपरंपरेची ही साधना आपणांला सामान्यतः दोन भागांत विभागतां येईल; एक शास्त्रसंमत आणि दुसरी शास्त्राबाहेरची पण स्वानुभवसंमत. या दोन्ही प्रणालिकांचे निदर्शक असे भिन्नभिन्न सूचक शब्द भिन्नभिन्न धर्मांत व संप्रदायांत आढळतात. इस्लाम-मध्यें 'बाशरा' म्हणजे शास्त्रसंमत व 'बेशरा' म्हणजे शास्त्रबाह्य असे शब्द आहेत ...बंगालमधील बाऊल लोक 'दीर्घलडुरी' (ज्यांचें बंधनस्थान निश्चित आहे, पण दोरी मर्यादित, स्वाधीनतेपुरती, लांब ठेवली आहे) आणि 'बेडुरी' (म्हणजे बंधनमुक्त) असे शब्द उपयोजितात. मध्ययुगीन संत या दोहोंना 'लोकवेदपंथी' (अर्थात् लोकाचार व वेदाचार यांना प्रमाण मानणारे) 'अनभौसाच' (म्हणजे अनुभवद्वारा प्रत्यक्ष अनुभवलेलें सत्य मानणारे) असें म्हणतात.

"वर दर्शविलेल्या परिभाषेप्रमाणें आपणांला ज्या संतकवीचा (दादूचा) येथें विचार करावयाचा आहे तो 'बेशरा' किंवा 'अनभौसाच' परंपरेचा एक प्रति-निधि आहे. रामानंद दाक्षिणेंतून ज्या भक्तीची परंपरा घेऊन उत्तरेंत आले आणि जाति व पंक्ति यांत त्यांनीं अभेद प्रस्थापित केला, त्याच परंपरेच्या साधनेचा हा एक वारस आहे."

## आपलें आर्थिक धोरण व राजकीय भवितव्य

ता. २३ जुलै १९४९ रोजी साजरा झालेल्या मुंबई–मराठी–साहित्यसंघाच्या "संघदिना"चे प्रसंगीं प्राचार्य धनंजयराव गाडगीळ यांनीं जें भाषण केलें तें अनेक दृष्टींनीं मननीय आहे. "साहित्य" द्वैमासिकाच्या जुलैच्या अंकांत तें समग्र दिलेलें आहे. प्राचार्य गाडगीळ यांचें नांव हिंदसरकारच्या आर्थिक सल्लागार खात्याचे अधिकारी म्हणून पुढें आलेलें होतें ही गोष्ट लक्षांत घेतां त्यांच्या विचारपूर्वक बनलेल्या मतांचें महत्त्व सहज लक्षांत येईल. प्रस्तुत भाषणांतील कांहीं भाग पुढें दिले आहेत:

"वि-नियंत्रण, राष्ट्रीयीकरण न करण्याची घोषणा व धानिकांवरील कर कमी करणें या सर्व गोष्टी एका सूत्रांत गोंवलेल्या आहेत. हें सूत्र म्हणजे हेतुपूर्वक आर्थिक नियोजन करण्याकरितां अर्थव्यवहाराचें मोठें क्षेत्र सरकारी मालकी अगर नियंत्रण याखालीं न आणतां, भविष्यांतील भिस्त बहुतांशीं खाजगी व्यवहारावर टाकावयाची. हें सूत्र व त्याचि पुढील धागे-दोरे यांची आज सर्वांस नटिशी कल्पना आहे असें म्हणवत नाहीं. परंतु हें नवीन धोरण फारसें लोकप्रिय दिसत नाहीं; त्यांतल्या त्यांत करपद्धतीवरील त्याचे परिणाम हे अनिष्ट आहेत अशी सुप्त भावना जिकडे तिकडे दिसते. वि-नियंत्रणास सर्व थरांतील व्यक्तींचा पाठिंबा मिळूं शकतो व धंद्यांचें राष्ट्रीयी-करण केलें पाहिजे या मताचा आपल्या देशांत अजून फारसा प्रचार झालेला नाहीं. पण सरकारी आर्थिक धोरणाचा परिणाम श्रीमंतांवरील प्रत्यक्ष कर कमी करून गरीबांच्यावर पडणाऱ्या अप्रत्यक्ष करांच्या वाढींत झाला म्हणजे मात्र कांहींतरी खचित चुकतें असें बहुजनांस वाटूं लागतें.

"गरीब देशांत भांडवल सांठविण्याचे दोनच मार्ग. सर्वांस जवळजवळ सारख्या राहणीच्या माना-वर आणून सक्तीनें सार्वदेशीय बचत करणें व दुसरा बहुजनसमाजास विशेष निकृष्टावस्थेंत ठेवून मूठभर लोकांचे हातांतील धनसंचय व सत्ता सारखी वाढ-तील अशी तरतूद करणें. पहिला मार्ग रशियानें चोखाळला आहे; दुसरा हिंदुस्थान चोखाळूं पाहात आहे. दुसऱ्या मार्गांत संपत्तीची व उत्पन्नाची विषम वांटणी सुरुवातीस असावी लागते; एवढेंच नव्हे तर ही विषमता सारखी वाढत जाणें या विशिष्ट परिस्थितींत अपरिहार्य आहे....

"या आर्थिक विषमतेला आळा दोन प्रकारें घालतां येईल. एक तर औद्योगिक मालाच्या किंम-तींचें कडक नियंत्रण करून त्यांना अल्प फायदा राहील अशी मुळांतच व्यवस्था करणें किंवा धनिक लोकांच्या अवास्तव उत्पन्नांवर जबर कर लादून समाजस्वास्थ्य वाढविण्याच्या योजनांकडे करांचें उत्पन्न वापरणें. यांतील एकहि धोरण हिंदुस्थान सरकार स्विकारण्यास तयार नाहीं हें आपण पाहिलेंच आहे....






" हिंदुस्थान सरकारच्या गेल्या दोन वर्षांतील आर्थिक धोरणाच्या कांहीं विशेषांचा हा आढावा झाला. यावरून जागतिक परिस्थितींत हिंदुस्थानचें स्थान कोणतें हें कळण्यास मदत होईल. रशियाचा साम्यवाद हिंदुस्थान-सरकारला मान्य नाहीं हें उघड आहे. इतकेंच नव्हे, तर पश्चिम युरोपीय राष्ट्रांनीं स्वीकारिलेला समाजवादहि हिंदुस्थानांत अंमलांत येण्याचा कांहीं संभव नाहीं. शेती-मालाच्या किंमती वगैरे बाबतींत हिंदुस्थान सरकारचें धोरण अमेरिकेपेक्षांहि निष्क्रिय आहे. म्हणजे कितीहि कायदे केले व केवढ्याहि घोषणा केल्या, तरी आर्थिक प्रगति खाजगी साहसी व्यक्तींमार्फत घडवून आणण्याचा निर्णय घेतल्यामुळें आधींच धनिक असलेल्यांचा धनसंचय वाढूं देणें, प्रत्यक्ष कराचा बोजा कमी करणें व इतर वर्गास तौलनिक दृष्ट्या डोकें वर काढूं देण्यास वाव न देणें या सर्व गोष्टी अपरिहार्य झाल्या आहेत. इतर सर्व बाबीं-प्रमाणें आर्थिक व्यवहारांत स्वराज्यनीतीनें कांहीं फरक झाल्यासारखा दिसत नाहीं. १९२० सालापासून आपल्या देशांतील व्यापारी—कारखानदार वर्गाच्या हातांतील आर्थिक बळ व राजकीय सामर्थ्य हीं सारखीं वाढत आहेत. हीं अशींच पुढें वाढत राहणार; निदान तीं अशींच पुढें वाढत राहावीं असें धोरण सरकार स्वीकारणार.

" निर्विकार मनानें पाहिलें असतां, सर्वच बाबतींत आपल्या देशाची परिस्थिति ग्रीस, स्पेन व चीन अशा देशांशींच विशेष तुलनीय ठरते. या सर्व देशांत गेल्या वीसपंचवीस वर्षांतील आर्थिक इतिहासांत एक चमत्कारिक विसंगति प्रत्ययास येत आहे. समाजवादाचा व साम्यवादाचा अंमल शांततेनें घडून येण्यास परिस्थिति जेथें अनुकूल तेथें त्याची आवश्यकता कमी तीव्र व जेथें आवश्यकता विशेष तेथें बंडाळीशिवाय अर्थव्यवस्था बदलणें कमी संभाव्य अशी ही विसंगति आहे! अत्यंत अल्पसंख्याकांचे हातीं सर्व अर्थव्यवस्थेची किल्ली असणें, भीषण गरीबी व बेसुमार श्रीमंती यांचें साहचर्य राहणें—या गोष्टींच्या निराकरणाकारितां सर्व प्रमुख अर्थव्यवहार सरकारी करणें आवश्यक मानण्यांत येतें. परंतु जेथें खरोखर अशी परिस्थिति असते तेथें समाजवाद चटकन् अंमलांत आणणें फार कठीण असतें. याचे उलट जेथें सार्वजनिक राहणीचें मान बरें, आर्थिक विषमता कमी, भांडवलवाल्यांत कार्यक्षम उत्पादनाची व सचोटीची परंपरा अधिक, तेथें समाजवादाच्या दिशेनें प्रगतीहि अधिक लवकर होते.

" आज इंग्लंडमधील राष्ट्रीयीकरणाचे विरोधी अनेक लेखक इंग्लंडमध्यें राष्ट्रीयीकरण अनावश्यक आहे असें मुख्यतः प्रतिपादितात. त्यांच्या मतें आज इंग्लंडमधील सर्व मोठे उद्योगधंदे कोणा व्यक्तीच्या ताब्यांत राहिले नसून मोठ्या सार्वजनिक मंडळ्यांच्या मालकीचे आहेत. या मंडळ्यांतील भागीदार बहुसंख्य व देशभर पसरलेले आहेत, व यांचा कारभार कोणाहि एका व्यक्तीच्या अगर गटाच्या हुकमतीखालीं अगर हिताकारितां चालत नाहीं...याच्या उलट हिंदुस्थानांतील परिस्थिति आहे. येथें उद्योगधंदे फार थोड्यांच्या हातीं व हे सर्व कांहीं विशिष्ट गटांतले...निरनिराळ्या प्रकारें सार्वजनिक मदतीनें काढलेल्या अगर चाललेल्या सर्व हिंदी उद्योगधंद्यांतलि मुख्य फायदा, त्यांच्या व्यवहाराची सर्व मलई किती थोड्या व्यक्तींना मिळते व ती सर्व विशिष्ट गटांत राखण्याचीं साधनें काय यांबद्दल चौकशी करणें राष्ट्रीय धोरणाच्या दृष्टीनें आज खरोखर फार महत्त्वाचें आहे. हिंदुस्थानांत असल्यापैकीं कोणतीच चौकशी होऊं घातल्याचें ऐकिवांत नाहीं.

" राजकीय मतौघ ( मूठभर लोकांची हुकमत कशी टिकेल ) असाच वाहत आहे. स्थानिक स्वराज्यसंस्था नव्हे तर प्रांतिक सरकारेंहि दुर्बल करावीं, मध्यवर्ती सरकारची सत्ता हरतऱ्हेनें वाढवावी, लढाईचीं रूपकें वापरून अंधश्रद्धा, अंधानुयायित्व यांवर भर द्यावा हेच प्रकार सर्वत्र दिसतात. भांडवलवाल्यांची आर्थिक सत्ता व राजकीय हुकुमशाही यांचें साहचर्य सर्वत्र असतें. त्यांत आतां रूसो—अमेरिकी लढ्याचें आयतेंच फावलें आहे... या परिस्थितीबाबत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. इतर सर्व तुल्य देशांत ती अशीच आहे. आणि आतां अमेरिकी मदत जास्त येऊं लागली म्हणजे ती एका दृष्टीनें आणखीच बिघडेल; कारण सत्ता-








घारी आज आहेत त्यापेक्षांहि कमी "लोकाभिमुख होतील...

"गेल्या दोन वर्षांतील आर्थिक धोरणाच्या इतिहासावरून मला एवढेंच वाटतें कीं, या देशांत संक्रमण शांततेनें होण्याचीं चिन्हें दूरावूं लागलीं आहेत, किंबहुना दूरावलींच आहेत. दोन वर्षांपूर्वी मी याबाबत आशावादी होतों...पण माझा आशावाद फाजील ठरला. परिस्थिति इतकी विषम व बिकट असतां केवळ कांहीं राजकीय पुढाऱ्यांच्या व अधिकाऱ्यांच्या जोरावर तींत मूलभूत फरक घडून येऊं शकतील ही आशा फोल ठरली. दिवसेंदिवस ही परिस्थिति सुधारणें कठीण होऊं लागलें आहे. यापुढें सत्ताधिकाऱ्यांचा व धनिकांचा उन्माद कमी होण्याचीं चिन्हें नाहींत; तो बळावणार. सत्ता टिकविण्याकरितां, असंतोषाचीं चिन्हें दडपून टाकण्याकरितां इरतऱ्हेचे प्रयत्न होणार. या सर्व लढ्यांत कोणास कांहींहि यश तात्कालिक येवो अगर न येवो, एकंदर मनांतल्या अढ्या व असंतोष, वर्गावर्गांतील, ज्ञाती-ज्ञातींतील अप्रीति व कलह वाढणार व आधींच कारभारांत आलेल्या ढिलाईचें पर्यवसान वाढत्या अराजकांत होणार असा धोका आज उघड दिसत आहे. परिणामीं, या मंथनांतून हलाहल निघो वा अमृत निघो; मध्यंतरींचा काळ कठीण जाणार हें खचित."

## अणु-संशोधन आणि अणुशक्तीचा विधायक उपयोग

महाराष्ट्रांतील भौतिक शास्त्राचे प्रसिद्ध प्राध्यापक प्रा. आर. एन्. जोशी यांनीं "माउली" साप्ताहिकाच्या स्वातंत्र्यदिन-विशेषांकांत "अण्वस्त्र" नांवाचा अणुबॉंब व अणुशक्ति यासंबंधीं एक लेख लिहिला आहे. त्यांत ते अणुशक्तीचें उत्पादन किती महागाईचें आणि अवघड आहे हें दर्शवून त्याचा उपयोग लोकोपयोगी कार्याकडे कसा करतां येईल तें दिग्दर्शित करतातः

"(अणुस्फोटाची) तात्विक बाजू समजणें व अण्वस्त्र तयार करतां येणें यामध्यें जमीन-अस्मानाइतका फरक आहे. कारण यांतील प्रत्येक गोष्ट मोठ्या प्रमाणावर घडवून आणण्यास एवढी मोठी यांत्रिक सिद्धता लागते, इतके तज्ज्ञ लागतात व एवढा खर्च येतो कीं साधारण यांत्रिकीकरणाच्या प्रथमावस्थेंत असलेल्या देशानें यासंबंधीं विचार करणेंहि अविचाराचें होईल. युद्धकाळीं देशांतील सर्व शक्ति केंद्रित करून अमेरिकेनें जेव्हां पहिला अणुबॉंब तयार केला तेव्हां तिला यांतील निरनिराळ्या कार्याकरितां कितीतरी नव्या प्रयोगशाळा काढाव्या लागल्या, कितीतरी कारखाने उभारावे लागले, व इतर प्रयोगशाळा व कारखाने यांचाहि याच कामाकरितां उपयोग करावा लागला. शास्त्रज्ञ, यांत्रिक व मजूर मिळून एक लाख लोकांना दोन वर्षें राबावें लागलें, व दोन अब्ज डॉलर खर्च करावे लागले! तेव्हां पहिला बॉंब तयार होऊन त्याचा यशस्वी तऱ्हेनें प्रयोग करितां आला. व तो सिद्ध झाल्यावर त्यांनीं त्या अस्त्राचा जपानवर उपयोग केला. अर्थात् यापुढें अणुबॉंब तयार करण्यास एवढी यातायात पडणार नाहीं व एवढा खर्चहि येणार नाहीं हें खरें. पण या आंकड्यांवरून दिसून येईल कीं, अल्प साधनसामग्री असलेल्या देशानें या अस्त्रामागें लागणें उपयुक्त होणार नाहीं.

"याचा अर्थ असा नव्हे कीं, देशांनीं अणुसंशोधन करूंच नये. कारण जरी त्यांना अण्वस्त्र साध्य झालें नाहीं तरी अणुसंशोधन चालूं असतां एका अणूच्या वस्तुकांचे (न्यूक्लिअसचे !) साहाय्यानें दुसऱ्या अणूंत रूपांतर करणें हें सहजसाध्य होण्यासारखें आहे. अशा रूपांतरित अणूंपैकीं कित्येक किरणदायी असतात, व त्यांतून येणाऱ्या किरणांच्या साहाय्यानें अनेक असाध्य रोग बरे करितां येतात. हल्लीं कॅन्सरवर रेडियम्मधून येणाऱ्या किरणांचा उपयोग केला जातो. रेडियम् हा दुर्मिळ व अति-महाग असल्यामुळें सर्वांस त्याचा उपयोग होत नाहीं. पण रेडियम्सारखेच किरण कृत्रिम तऱ्हेनें निर्माण केलेल्या किरणदायी अणूपासूनहि मिळतात व असे अणू वाटेल तेवढे तयार करतां येतात. त्यांचा इस्पितळांमध्यें सहज उपयोग करण्यासारखा आहे. तसेंच आपण घेत असलेल्या औषधांतील कांहीं अणूंचें किरणदायी अणूंत रूपांतर केल्यास औषध शरीरांतील भागांत कोठपर्यंत पोंचलें आहे हें कांहीं विशिष्ट दर्शकांचे साहाय्यानें समजून घेतां येतें. अशा तऱ्हेचा उपयोग पाश्चात्य देशांत् आजहि केला जात आहे.












म्हणून शांतताप्रिय देशांनीं अणुशक्तीचा व अणुज्ञानाचा उपयोग शांततेच्या कार्याकडेच करणें हें अण्वस्त्र निर्माण करण्यापेक्षां अधिक श्रेयस्कर आहे, व या दृष्टीनें जितकें अणूविषयीं संशोधन होईल तितकें जरूर आहे. अण्वस्त्रानें शहरें नाहींशीं करणें शक्य असलें तरी दूरवर खेडोंपाडीं पसरलेल्या लोकांचा नाश करणें शक्य नाहीं व त्या अण्वस्त्रास फारसें भिण्याचेंहि कारण नाहीं."

## गुजरात-युनिव्हर्सिटी-समितीच्या शिफारसी व मतमतांतरें

मुंबई विद्यापीठाचा आवांक्याबाहेर गेलेला बोजा हलका व्हावा या हेतूनें पुण्याला व कर्नाटकांत अशा दोन नवीन युनिव्हर्सिट्या काम करूं लागल्या आहेत; आणि गुजराथसाठीं युनिव्हर्सिटी कशी असावी, यासंबंधींच्या शिफारसी सरकारनें नेमलेल्या समितीनें बहुमतानें केल्या आहेत. परंतु त्या अहवालाला कांहीं गंभीर स्वरूपाच्या भिन्नमतपत्रिका जोडलेल्या आहेत.

समितीच्या अहवालांत खास लक्ष वेधून घेणारी भिन्नमतपत्रिका, महात्माजींच्या 'गुजरात विद्यापीठा'चे महामात्र श्री. मगनभाई देसाई यांची आहे. ती प्रदीर्घ भिन्न मतपत्रिका "शिक्षण अने साहित्य" मासिकाच्या जुलै–ऑगस्ट जोड-अंकांत दिली आहे. त्यांत श्री. मगनभाईंनीं गांधीजींच्या विद्यापीठविषयक विचारांचें आणि चळवळींचें रहस्य स्पष्ट केलें असून पुढें ही युनिव्हर्सिटी वासाहतिक स्वरूपाची व शिक्षणदायी असावी, प्रादेशिक हुकमतींकडे तिनें लक्ष देऊं नये, कारण शिक्षणदान व हुकमत यांचा समन्वय होणें दूरापास्त होतें व उलट प्रादेशिक हुकमतीची व परीक्षाद्वारें द्रव्योपार्जनाची प्रवृत्ति वाढून शिक्षणदानाकडे दुर्लक्ष घडतें, असें साधार प्रतिपादन केलें आहे. गांधीजींच्या स्फूर्तीनें शिक्षणकार्य सुरू झालेल्या गुजरातची परिस्थिति कशी विशिष्ट प्रकारची आहे तें स्पष्ट करतांना ते लिहितातः

"अहवालांत सहाव्या कलमांत हें बरोबर नमूद केलें आहे कीं, 'राष्ट्रीय शिक्षणाच्या ह्या परंपरेनें स्वतःला अधिक बलवत्तरपणें व दृढतेनें स्थापित करण्याची इच्छा दाखवावी यांत नवल करण्यासारखें कांहीं नाहीं.' एवढेंच नव्हे तर अहवाल यापुढें जाऊन यथार्थपणें कबूल करीत आहे कीं, 'पुष्कळ लोक' गांधीजींनीं दाखविलेल्या मार्गावरचेंच एक पुढचें व आवश्यक पाऊल म्हणून गुजरातसाठीं निराळें विद्यापीठ असावें या बाजूचे होते हें आम्हांला कळलेलें आहे. हे लोक सध्यांच्या चालू शिक्षणांतील वस्तु आणि भावना यांना मुळांतूनच इतके बदलूं पाहात होते कीं जेणेंकरून त्याचा त्या (राष्ट्रीय) परंपरेशीं मेळ बसावा'.

"परंतु मला खेदपूर्वक असें म्हटलें पाहिजे कीं अहवालांत यापुढें जें कांहीं आलें आहे त्यावरून वरील विचारांतून निसटून जाण्याच्या प्रयत्नासारखें हें आहे असें मला वाटतें आणि त्यांत गुजरातेंतील साहित्यिक व शैक्षणिक जगांत ज्या निरनिराळ्या विचारप्रणालिका नजरेस पडतात त्यांचा समन्वय साधण्यासाठीं मुख्य बिंदु शोधण्याचा कांहीं प्रयत्नच झालेला दिसत नाहीं..."

या भिन्न मत-पत्रिकेला जीं परिशिष्टें जोडलीं आहेत त्यापैकीं एकांत गांधीजींचीं श्री. मगनभाईंना व श्री. मावळंकर (गुज. युनि. समितीचे अध्यक्ष) यांना आलेलीं पत्रें दिलीं आहेत. गांधीजी श्री. मावळंकरांना लिहितात :

"एक नवीन हकीकत मला तुमच्याकडून कळली कीं आतां भाषावार विद्यापीठ फक्त गुजरातेचेंच बाकी राहिलें आहे. ही हकीकत माझ्या मुद्याची तीव्रता कमी करते हें मला कबूल केलें पाहिजे. तरीसुद्धां माझा लोभ म्हणा, असा आहे कीं हें शेवटचें विद्यापीठ हिंदुस्थानच्या संस्कृतीला म्हणजेच त्यांतील खेडेगांवाच्या संस्कृतीला अधिक वाढवील..."

आनंद येथें जें शिक्षणकेंद्र प्रगति करीत आहे त्या वल्लभविद्यानगरींत गांधीजींच्या वरील हेतूला अनुसरून, खेडेगांवाला मध्यवर्ती कल्पून, शैक्षणिक प्रयोग करावयाची कल्पनाच मुख्यतः आहे.






